


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

**संपादक :** नीलिमा गुंडी
**संपादकीय-सल्लागार :** अशोक रा० केळकर, मॅक्सीन बर्नसन, आशा मुंडले
**संपादन-समिती :** नीलिमा गुंडी (प्रमुख), प्र०ना० परांजपे, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर
**संपादकीय पत्रव्यवहार :** नीलिमा गुंडी, 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411 002. संपर्क : (020) 2448 6015 ई-पत्ता : nmgundi@gmail.com
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनंद काटीकर, द्वारा मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. चलभाष : 094216 10704
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. स्थिरभाष : (020) 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 093731 04093 **विजय पाध्ये** - 098220 31963. marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) **वार्षिक वर्गणी** - एक वर्ष तीन वर्षे पाच वर्षे

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| **व्यक्ती :** | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| **संस्था :** | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/- + नोंदणी शुल्क ₹ १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान ₹ २,५००/-, अर्धे पान ₹ १,५००/-, पाव पान ₹ ८००/-, शुभेच्छा ₹ ४००/-. आवरण पृष्ठ तीन ₹ ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी).

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

## अभिनंदन

मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सदस्य डॉ० नागनाथ कोत्तापल्ले हे जानेवारी २०१३मध्ये चिपळूण येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. त्याबद्दल मराठी अभ्यास परिषदेतर्फे त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन व त्यांच्या अध्यक्षीय कारकीर्दीस शुभेच्छा !

---

## नववर्षाच्या शुभेच्छा

मराठी अभ्यास परिषदेचे सर्व सदस्य, देणगीदार तसेच 'भाषा आणि जीवन'चे वाचक, लेखक आणि हितचिंतक यांना नवीन वर्षाच्या शुभेच्छा !

---

## महाबँक भाषाविषयक लेखन-पुरस्कार २०१३

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने इ०स० १९८३ पासून महाराष्ट्र बँकेच्या सहकार्याने मराठीतील उत्तम भाषाविषयक लेखनाला दरवर्षी पुरस्कार दिला जातो. रु० ५००० आणि गौरवपत्र असे या पुरस्काराचे स्वरूप आहे. कोणत्याही भाषेविषयीचा मराठी भाषेतील प्रकाशित ग्रंथ, कोश, अप्रकाशित संशोधनप्रबंध, संपादित लेखसंग्रह इत्यादी भाषाविषयक वैचारिक ग्रंथांचा ह्या पुरस्कारासाठी विचार केला जातो.

ह्या वर्षीच्या पुरस्कारासाठी इ० स० २०११ आणि २०१२ ह्या दोन वर्षांतील पुस्तकांचा विचार केला जाणार आहे. तरी अशा ग्रंथांच्या लेखकांनी किंवा प्रकाशकांनी आपले ग्रंथ, परीक्षण-समितीचे निमंत्रक श्री० विजय पाध्ये ४, चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी, महेश सोसायटी परिसर, बिबवेवाडी, पुणे ४११०३७. (चलभाष : ९८२२०३१९६३ स्थिरभाष : (०२०) २४४११९५), ह्यांच्याकडे दि० २७ फेब्रुवारी २०१३पर्यंत पाठवावे.

---

परिषदवार्ता

## देणगी

श्री० द्वारकानाथ कलंत्री यांनी मराठी अभ्यास परिषदेला ₹ १०००/- देणगी दिली आहे. परिषद त्यांची ऋणी आहे.

---





अनुक्रमणिका

संपादकीय

# बोली आणि बालभारती

मृणालिनी शहा

बोली म्हणजे जी फक्त बोलली जाते, ती भाषा. या भाषेतून वैचारिक लेखन फारसे होत नाही. झालेच तर ललितलेखन निर्माण होते. अहिराणी, कोकणी, ठाकरी, खानदेशी, माणदेशी अशा मराठी भाषेच्या कितीतरी बोली आहेत. या बोली साधारणपणे खेड्यापाड्यांतून बोलल्या जातात. प्रमाण मराठीतून गंभीर वैचारिक लेखन होत असते. उदा० पाठ्यपुस्तके वगैरे.

'बालभारती' म्हणजे सरकारने तयार करून प्रसिद्ध केलेली प्राथमिक आणि शालेय पाठ्यपुस्तके. ही पाठ्यपुस्तकेच महाराष्ट्रभर वापरली जातात. यामध्ये मराठीप्रमाणेच इतिहास, भूगोल, विज्ञान, गणित इत्यादी विषयही असतात. या पुस्तकांद्वारेच महाराष्ट्रभर शिक्षण दिले जाते.

बोली आणि बालभारती यांचा संबंध कसा, केव्हा आणि कधी येतो त्याचाच विचार येथे करणार आहोत.

भाषिक विविधता टिकवण्यासाठी बोली जिवंत राहण्याची गरज आहे, हे सत्य सर्व भाषाशास्त्रज्ञ आणि भाषाप्रेमी तत्त्वत: मान्य करतात. बोलींचा थोडाफार अभ्यासही होऊ लागला आहे, हे आपण बोली विशेषांकाच्या निमित्ताने पाहिलेही आहे. या बोली जिवंत राहण्यासाठी अनेकविध रीतीने प्रयत्न करण्याची गरज आहे. त्यासाठी काही लोकांना आपापल्या बोलींमध्ये बोलण्यास प्रवृत्त करणे, प्रमाणभाषेचा बागुलबुवा त्या लोकांना वाटणार नाही असे वर्तन करणे आणि त्यांच्या वेगळ्या भाषेचा सन्मान करणे इत्यादी प्रयत्न करण्याची आवश्यकता आहे. हे प्रयत्न तुम्हीआम्ही सर्वांनी करावयाचे आहेत. प्रमाणभाषेच्या जवळ जाणाऱ्या बोलींमध्ये जे लोक बोलत आहेत, त्यांनी तर जाणीवपूर्वक या बाबींकडे लक्ष दिले पाहिजे.

या सर्व गोष्टींबरोबरच आणखी एका बाबीकडे लक्ष वेधावेसे वाटते आहे. ती म्हणजे या विविध बोलींमध्येच मुलांना प्राथमिक शिक्षण देणे, ही होय. विशिष्ट बोली बोलणाऱ्या लहान मुलांना प्रमाण मराठीतून शिकणे, परकीय भाषेमधून शिकण्याइतकेच कठीण असते. या बोलीतील उच्चारण, शब्द आणि व्याकरण या बाबी भाषिक दृष्ट्या निरनिराळ्या असू शकतात. उदाहरणार्थ, अहिराणीतील 'डोया', प्रमाणभाषेतील 'डोळा' असतो. हे आणि असेच इतर शब्द पहिलीदुसरीतील मुलांच्या लक्षात येत नाहीत. त्यांचा सुरुवातीला

वैचारिक गोंधळ उडू शकतो. तसेच शिकविणारे शिक्षकही संख्येने कमी असणाऱ्या या मुलांच्या भाषिक अडचणी लक्षात घेत नाहीत. तर काही वेळा शिक्षकही दुसऱ्या बोली बोलणारे असतात. ते आपल्या पद्धतीने उच्चारण करत असतात. त्या मुलांच्या काहीच लक्षात येत नाही. स्वाभाविकपणेच त्यांच्या प्रगतीमध्ये अडथळा येऊ शकतो. काही हुशार विद्यार्थ्यांचा अपवाद वगळता बाकीच्या सामान्य विद्यार्थ्यांची परिस्थिती कमीअधिक प्रमाणात हीच असते. आणि इकडे सरकारी यंत्रणा मात्र आपण सर्व खेड्यापाड्यांतही शिक्षणाची सोय करतो, या समाधानात असते. खेड्यापाड्यांतील प्राथमिक शिक्षणाची दुरवस्था आपण सर्वजण जाणत असतोच.

प्राथमिक किंवा शालेय शिक्षणात कोणतीही संकल्पना समजून घेण्यासाठी मुलांची पहिली भाषाच उपयोगात आणावी, असा सल्ला भाषाशास्त्रज्ञ देत असतात; परंतु त्यांचा हा मौलिक सल्ला कोण विचारात घेतो? खेड्यापाड्यांतील धनिक लोक किंवा मध्यमवर्गीय लोक आपल्या मुलांना सामान्यत: इंग्रजी माध्यमांच्या शाळेत घालतात. (त्यांच्या समस्या आणखी वेगळ्या आहेत.) त्यामुळे सरकारी मराठी माध्यमांच्या शाळांमध्ये आर्थिक दृष्ट्या निम्न स्तरावरील मुलेमुलीच जातात. त्यांच्या बोली वेगळ्या असल्या तरी त्यांना एकाच प्रमाणभाषेत शिक्षण मिळत असते. त्यांचा शैक्षणिक दर्जा वाढावा म्हणून सरकार किंवा बालभारतीचे नियामक मंडळ काही प्रयत्न करते आहे, असे दिसत नाही.

त्यासाठी बालभारतीची पहिलीदुसरीची किंवा फारतर चौथीपर्यंतची पुस्तके मुलांच्या बोलीभाषेत असणे आवश्यकच नाहीतर महत्त्वाचेही आहे. गणितातील त्रिकोण, वर्तुळ इत्यादी संकल्पना त्यांच्या बोलीत समजावून देणे महत्त्वाचे असते. त्रिकोणाला तिकोन तर वर्तुळाला गोल-गरगरीत असे शब्द ही मुले वापरत असतात. त्यांच्या बोलीतील शब्द जर पाठ्यपुस्तकात आले तर त्या मुलांची प्रगती चांगली होण्याची शक्यता आहे, यासाठीच बालभारतीची पहिलीदुसरीची पुस्तके बोलीभाषेत करून दिल्यास मग ती मुले आपोआप प्रमाणभाषेच्या प्रवाहात येतील. परंतु असे काही होताना दिसत नाही. ह्या कोंडीतून सुटका कशी करायची हा कळीचा प्रश्न आहे. सरकारी यंत्रणा जाऊ देत; पण आपण तरी (काही सन्मान्य अपवाद वगळता) कुठे या बाबींचा गांभीर्याने विचार करतो आहोत? विचार केला तरी कृती करण्याची धडपड करत नाही, हे सत्य कोणीही नाकारू शकत नाही.

बालभारतीच्या ह्या प्रश्नाची सोडवणूक करण्याचे प्रयत्न झाले आहेत त्याचा धावता आढावा घेता येतो. साधारण १९७७च्या सुमारास अभ्यासक्रमाच्या सुलभीकरणाची प्रक्रिया एस०सी०ई०आर०टी०तर्फे चालू झाली होती. त्यासाठी काही कोशही तयार करण्यात आले; परंतु हे कोश क्लिष्ट भाषेत झाले होते. १९८६च्या सुमारास 'युनिसेफ'तर्फे बोलीभाषेत पाठ्यपुस्तके तयार केली गेली होती. चंद्रपूर जिल्ह्यातील राजूर तालुक्यात



अनुक्रमणिका

पुण्यातील एक प्राध्यापक पाहणीसाठी गेले होते. त्यांचा तिथला अनुभव विदारक होता. पाठ्यपुस्तकांचे गठ्ठेच्या गठ्ठे पडून होते, तिथल्या जिल्हापरिषदेच्या कार्यालयात! आपल्याकडे कोणताही नवीन पायंडा पाडणे कसे कठीण असते, याचा प्रत्यय नेहमी येत असतो.

बालभारती खानदेशी, अहिराणी किंवा कोकणातील छोट्यामोठ्या बोलींमध्ये नाही, पण आदिवासी बोलींमध्ये २०१३ला पाठ्यपुस्तके तयार करणार आहे. पण हा प्रयोगही तिथे किती यशस्वी ठरतो याबद्दल शंकाच वाटते. कारण तिथल्या आदिवासींना असे अलग शैक्षणिक धोरणच नको आहे, असे काही स्वयंसेवी संस्थांकडून समजले आहे. आता सरकारी यंत्रणा तयार आहे तर आदिवासींची सामाजिकता-मानसिकताच बदलली आहे. अशा परिस्थितीमध्ये पुन्हा कोंडी निर्माण होते. ही कोंडी फोडण्यासाठी पुन्हा अभ्यासकांना, कळकळ असणाऱ्यांना प्रयत्न करावे लागणार आहेत. या आदिवासींसाठी पूरक साहित्य तयार करून त्याच्याद्वारे शिक्षण घ्यावे लागणार आहे. त्यातून त्या बोलीचे अभिव्यक्ती स्वातंत्र्यही टिकेल आणि त्यांच्या प्रगतीचा आलेख नीट राहील.

बोलींना वाचवायचे असेल तर बालभारतीपेक्षा तुम्हीआम्ही तसेच स्वयंसेवी संस्थांनीच पुढे यायला हवे, अशाच निष्कर्षाप्रती यावे लागते.

■

**परिषदवार्ता**

मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारी मंडळात रंजना फडके यांच्या निधनामुळे रिक्त झालेल्या जागेवर सलील वाघ यांना सदस्य म्हणून घेण्यात आले आहे.

**स्वागत**

(१) 'मराठीचे आधुनिकीकरण' (मराठी वृत्तपत्रांचे योगदान), डॉ० विलास चिंतामण देशपांडे, विसा बुक्स, नागपूर, २०१२, पृष्ठसंख्या २५४, मूल्य ₹ २७५/-





अनुक्रमणिका

# बहुमुखी साहित्यव्यवस्थेच्या अंतर्गत भाषांतरित साहित्याचे स्थान*

मूळ इंग्रजी लेख - **इटामार एव्हिन-झोहर**
मराठी भाषांतर - **पद्माकर दादेगावकर**

**(भाषांतरविद्येचे मोठे अभ्यासक जेम्स एस० होम्स यांच्या स्मृतीस अर्पण)**

१

कोणत्याही देशाच्या सांस्कृतिकजडणघडणीत भाषांतरांची भूमिका फार महत्त्वाची असते. देशाचा सांस्कृतिक इतिहास लिहिणारे ही बाब ढोबळपणे मान्य करीत असले तरी आजवर या क्षेत्रात तुलनेने फारच कमी संशोधन झालेले आहे. जेव्हा टाळणे अगदीच अशक्य असेल तेव्हाच, म्हणजे मध्ययुगीन साहित्याच्या किंवा पुनर्जागरण काळाच्या संदर्भात विचार करतानाच भाषांतराचा उल्लेख करायचा असा जणू साहित्येतिहासकारांचा नियमच झाला आहे. शोधू गेलो तर इतर काळातही व्यक्तिगत भाषांतर-कृतींचे उल्लेख अधूनमधून सापडतात, पण त्यांचा इतिहासाच्या समग्र मांडणीत सुसंगतपणे समावेश केलेला मात्र क्वचितच आढळतो.

परिणामी, समग्र साहित्याच्या संदर्भात भाषांतरित साहित्याचे कार्य काय अथवा त्या साहित्याच्या अंतर्गत या भाषांतरित साहित्याचे स्थान काय याची काहीच कल्पना करता येत नाही. मग विशिष्ट साहित्यव्यवस्था म्हणून भाषांतरित साहित्याच्या अस्तित्वाची जाणीव असणे तर दूरच. प्रचलित संकल्पना आहे ती स्वतंत्रपणे 'भाषांतर' अथवा 'भाषांतरित कृती' म्हणून त्याची दखल घेणे एवढीच.

भाषांतरित साहित्यासाठी यापेक्षा काही वेगळे गृहीतक - उदाहरणार्थ भाषांतरित साहित्य ही एक व्यवस्था वा प्रणाली आहे - मांडायला काही आधार आहे काय? भाषेतल्या मूळ साहित्यकृतींमध्ये जसा आपण सांस्कृतिक आणि मौखिक नात्यांचा एक आंतरसंबंध धरून चालतो, तसाच आंतरसंबंध भाषांतरित साहित्य कृतींमध्येही असतो का? भाषांतरित कृती या परकीय साहित्यातून आयात केलेल्या, मूळ संदर्भांपासून तोडलेल्या आणि केंद्र व परीघाच्या संघर्षात परिणामतः तटस्थ ठरविल्या गेलेल्या असतात. एवंगुणविशिष्ट अशा या कृतींमध्ये परस्पर संबंध कोणत्या प्रकारचे असतील?

---

*प्रस्तुत भाषांतर करताना अरविंद विश्वनाथ (कुळकर्णी) यांची मोठीच मदत झाली.

माझ्या मते भाषांतरित कृती लक्ष्यित साहित्याशी किमान दोन तऱ्हांनी संबद्ध होत असतात : (अ) एक म्हणजे लक्ष्यित साहित्याने ज्या पद्धतीने मूळ संहितांची निवड केलेली असते ती. तेव्हा, कारण (अगदी काळजीपूर्वक शब्द वापरायचे तर) अशा निवडीची तत्त्वे कधीही लक्ष्यित साहित्याच्या स्वतःच्या सह-व्यवस्थेशी असंबद्ध नसतात; (आ) आणि दुसरे म्हणजे भाषांतरित कृती लक्ष्यित साहित्य व्यवहारातील समग्र घटकांशी म्हणजे मूळ साहित्य व्यवस्थेतील उप-व्यवस्थांशी असणाऱ्या संबंधांमधून निर्माण होणारे त्याचे विशिष्ट निकष, वर्तन, पद्धती यांच्याशी ज्या तऱ्हेने जुळवून घेतात ती तऱ्हा. आणि हे जुळवून घेणे केवळ भाषिक पातळीपुरतेच मर्यादित नसते तर निवडीच्या सर्व पातळ्यांवर दृग्गोचर होत असते. थोडक्यात, भाषांतरित साहित्याची स्वतःची अशी काही घटक वैशिष्ट्ये असू शकतात, आणि काही वेळ तर ती त्याची खास स्वतःपुरतीही असू शकतात. (पाहा - टोरी १९८५ आणि १९८५ अ)

वरील मुद्यांमुळे भाषांतरित साहित्याबद्दल बोलणे केवळ उचितच नव्हे, तर अत्यावश्यकही ठरते. हे मान्य केले नाही तर बहुमुखी साहित्यव्यवस्थेच्या समकालिक आणि भिन्नकालिक वर्तनाचे विवरण आणि स्पष्टीकरण पुरेशा गांभीर्याने व पर्याप्तपणे पुढे कसे नेता येईल हे मला समजत नाही. दुसऱ्या शब्दांत, माझ्या मते भाषांतरित साहित्य हे कोणत्याही बहुमुखी साहित्यव्यवस्थेचा एक केवळ अभिन्न भागच नसते, तर त्या व्यवस्थेच्या अंतर्गत असलेली ती एक अत्यंत सक्रिय अशी उपव्यवस्था असते. पण त्या बहुमुखी साहित्यव्यवस्थेच्या अंतर्गत या व्यवस्थेचे स्थान काय असते, आणि हे स्थान त्या व्यवस्थेच्या इतर समग्र घटकांशी कसे जोडलेले असते? साहित्याच्या अभ्यासात भाषांतराचे स्थान नेहमी परिघावरचे असते, यावरून एखाद्याला असा निष्कर्ष काढायचा मोह होईल की त्या बहुमुखी व्यवस्थेत भाषांतराचे स्थानही कायम परिघावरच राहत असेल; पण असे मुळीच नाही. भाषांतरित साहित्य हे गाभ्यावर असेल की परिघावर, आणि त्याचे स्थान त्या बहुमुखी व्यवस्थेच्या प्रधान घटकांशी जोडलेले असेल की गौण घटकांशी; हे त्या व्यवस्थेच्या विशिष्ट संरचनेवर अवलंबून असते.

२

भाषांतरित साहित्य हे एखाद्या साहित्यव्यवस्थेच्या गाभ्यावर आहे असे म्हणणे म्हणजे ते त्या व्यवस्थेच्या गाभ्याला आकार देण्यात सक्रियपणे सहभाग घेत असते, असे म्हणणे होय. अशा स्थितीत त्या व्यवस्थेमध्ये ज्या नवसर्जनशील शक्ती कार्यरत असतात त्यांचे भाषांतरित साहित्य हे एक अभिन्न अंग असते असे एकंदरीत म्हणता येते. त्यामुळे एखाद्या साहित्याच्या इतिहासात जेव्हा प्रचंड घडामोडी होत असतात तेव्हा भाषांतरित साहित्य हे त्यांचे अभिन्न अंग असते असेही म्हणता येईल. अशा वेळी 'मूळ' लेखन आणि

'भाषांतरित' लेखन यांत स्पष्ट भेद केला जात नाही, आणि मग बहुतेक वेळा त्या भाषेतील जे आघाडीचे लेखक असतात (किंवा जे पुरोगामी लेखक आघाडीचे लेखक होण्याच्या मार्गावर असतात) ते डोळ्यात भरणारी किंवा लोकप्रिय अशी भाषांतरे सादर करताना दिसतात. आणखी असे की, अशा स्थितीत जेव्हा नवनवे प्रकार त्या साहित्यात अवतरायला लागतात तेव्हा भाषांतर हे त्या साहित्यातील नवीन घाटांचे विश्लेषण आणि विवेचन करण्याचे एक साधन बनण्याची शक्यता असते. इतर भाषांतील कलाकृतींच्या माध्यमातून लक्ष्यित साहित्यात पूर्वी अस्तित्वात नसलेली वैशिष्ट्ये आणि तत्त्वे आढळून यायला लागतात. त्यात केवळ जुन्या आणि प्रस्थापित पण आता प्रभावहीन बनलेल्या रूपबंधांची जागा घेणारे नवे, वस्तुनिष्ठ रूपबंधच असतात असे नाही तर इतरही अनेक नवी तत्त्वे असतात. उदाहरणार्थ, नवी (काव्यात्म) भाषा, रचनेची नवी तत्त्वे आणि तंत्रे इत्यादी. हे स्पष्ट आहे की भाषांतरासाठी निवडल्या जाणाऱ्या संहितांचे निकष लक्ष्यित साहित्यव्यवस्थेची त्या काळात जी अवस्था असेल ती परिस्थिती निश्चित करीत असते. संहितांची निवड लक्ष्यित भाषेत प्रादुर्भूत होणारे नवे दृष्टिकोन आणि अशी संहिता त्या व्यवस्थेत बजावू शकणारी सर्जनशील भूमिका या गोष्टींशी त्यांची सुसंगती आदींनी निश्चित केली जात असते.

तर मग अशी परिस्थिती केव्हा निर्माण होते? माझ्या मते अशा तीन अवस्था असू शकतात आणि त्या तीनही वास्तविक एकाच तत्त्वाचे भिन्न भिन्न आविष्कार आहेत : (अ) जेव्हा त्या साहित्यव्यवस्थेची जडणघडण अजून पूर्ण झालेली नसते, म्हणजे जेव्हा ते साहित्य 'तरुण' असते, प्रस्थापित व्हायच्या प्रक्रियेत असते; (आ) जेव्हा ते साहित्य (एकूण एका मोठ्या संबद्ध साहित्य समूहाच्या) 'परिघावर' असते किंवा 'क्षीण'[१] असते किंवा दोन्ही असते; आणि (इ) जेव्हा ते साहित्य वळणावर उभे असते, त्यात आणीबाणीचे प्रसंग आलेले असतात किंवा वाङ्मयीन पोकळ्या निर्माण झालेल्या असतात.

पहिल्या अवस्थेत भाषांतरित साहित्य नव्याने प्रस्थापित झालेल्या किंवा पुनर्निर्मित झालेल्या वाङ्मयभाषेचा पुरेपूर वापर करीत त्या तरुण साहित्याची गरज भागवीत असते. म्हणजे शक्य असतील तितके नवनवीन साहित्यप्रकार साहित्यात आणून ती भाषा वापरणाऱ्या समाजाला ती वाङ्मयभाषा जितकी उपयुक्त आणि वापरास सोयीची होईल तितकी करण्याचे काम भाषांतरे करीत असतात. त्या साहित्यव्यवस्थेतील लेखकांना ज्ञात असलेल्या सर्व साहित्यप्रकारांमध्ये निर्मिती करणे त्या तरुण असलेल्या साहित्याला लगेच शक्य नसते, त्यामुळे इतर भाषांमधील साहित्याच्या अनुभवाचा लाभ त्याला मिळतो आणि अशाप्रकारे भाषांतरित साहित्य ही त्या साहित्यातील एक महत्त्वाची व्यवस्था बनते. दुसऱ्या अवस्थेत - म्हणजे जी साहित्यव्यवस्था तुलनेने प्रस्थापित असते; पण जिचे

स्रोत मर्यादित व क्षीण असतात आणि जी एका मोठ्या व्यवस्थेच्या परिघावर असते - त्या अवस्थेत देखील असेच घडत असते. परिणामी अशा साहित्यात आजूबाजूच्या मोठ्या साहित्यव्यवस्थेत आढळून येणाऱ्या अनेक वाङ्मयीन प्रक्रिया विकसित झालेल्या दिसत नाहीत. आणि त्याचा परिणाम म्हणून ती मोठी साहित्यव्यवस्था अत्यावश्यक, अनिवार्य आहे असे वाटू लागण्याची भावना निर्माण होते. मोठ्या व्यवस्थेच्या तुलनेत आणि तिच्या सान्निध्यांत या परिघावरच्या व्यवस्थेत काही घटकांची 'उणीव'ही तीव्रपणे जाणवू लागते. ही उणीव मग कधी पूर्णपणे तर कधी काही अंशाने भरून काढण्याचे काम भाषांतरित साहित्य करू शकते. उदाहरणार्थ, अशा अवस्थेत परिघावरचे सर्व साहित्य हे भाषांतरित असू शकते. पण अधिक महत्त्वाचा परिणाम म्हणजे नवसर्जनशीलतेला चालना देण्याची या 'क्षीण' साहित्याची क्षमता तुलनेने मोठ्या आणि गाभ्यावर असलेल्या साहित्य व्यवस्थेपेक्षा कमी असल्यामुळे त्याच्या केवळ परिघावरच्याच नव्हे तर अगदी केंद्रभागी असलेल्या साहित्यामध्येही परावलंबित्वाची वृत्ती वाढीस लागू शकते. (गैरसमज होऊ नयेत म्हणून मी इथेच स्पष्ट करू इच्छितो की इतर काही बहुमुखी व्यवस्थांमधे जशा परिघावरील व्यवस्था केंद्रभागी येऊ शकतात त्याच धर्तीवर भाषांतरित साहित्यही केंद्र भागावर पोचू शकते. पण त्याची चर्चा इथे करणे शक्य नाही.)

पश्चिम गोलार्धातील साहित्य प्राय: छोट्या राष्ट्रांच्या साहित्याशी समरूप असते. ही कल्पना पचायला जरा जड जात असली तरी एक गोष्ट मान्य करण्यावाचून पर्याय नाही की युरोपच्या साहित्यांमध्ये श्रेणीय संबंध त्या साहित्याच्या प्रारंभापासूनच प्रस्थापित झालेले दिसून येतात. या बृहत् साहित्यव्यवस्थेतील काही साहित्यांनी परिघावरची जागा घेतलेली असते. म्हणजे त्यांचे प्रारूप बव्हंशी बहि:स्थ साहित्यावर बेतलेले असते. अशा साहित्यव्यवस्थांसाठी, भाषांतर हे अद्ययावत साहित्यघटक स्वगृही आणण्याचे केवळ एक माध्यमच नसते तर, काही पर्याय पुरवण्याचा आणि त्यांची उलथापालथ करून पाहण्याचा ते एक स्रोतही असते. अशा रीतीने, सबळ आणि समृद्ध साहित्यांना एतद्देशीय परिघावरील सीमेतून काही नवे घटक अंगीकारण्याचा पर्याय असतो, मात्र 'क्षीण' साहित्य बहुधा आयातीवरच अवलंबून असते.

अशा बहुमुखी साहित्यव्यवस्था आपल्या अंगभूत गतिमानतेमुळे तीत काही वेगळी वळणे निर्माण करतात. म्हणजे काही ऐतिहासिक क्षण असे येतात की प्रस्थापित घाट नव्या पिढीला उपयोगी वाटेनासे होतात. अशा वेळी खुद्द मुख्य साहित्यव्यवस्थेतही भाषांतरित साहित्य केंद्रभागी येऊ शकते. एखाद्या साहित्यव्यवस्थेत जेव्हा नवीन बदल होत असतात तेव्हा एतद्देशीय घाटांपैकी कोणताही घाट ग्राह्य वाटत नसल्यामुळे त्या साहित्यात 'पोकळी' निर्माण होते. अशा पोकळीत परकीय प्रारूपांना अतिक्रमण करणे सोपे जाते, आणि परिणामी भाषांतरित साहित्य केंद्रीय स्थान घेऊन बसते. आणि

अर्थातच, ज्या साहित्य व्यवस्था 'क्षीण' असतात, शेजारच्या किंवा सहजपणे उपलब्ध होणाऱ्या परकीय भाषांमधे असणाऱ्या घटकांची सतत उणीव असल्यामुळे ज्या अभावग्रस्त असतात, त्यांच्या बाबतीत तर ही परिस्थिती आणखीच गंभीर असते.

३

हे मान्य केले तर भाषांतरित साहित्य हे नेहमी परिघावरचे स्थान राखत असते असे म्हणता येते, म्हणजे सर्वसाधारणपणे दुय्यम प्रारूपांचा वापर करणारी ती परिघावरची स्वतंत्र व्यवस्था असते असे ठरते. अशा स्थितीत त्यांचा प्रमुख वाङ्मयीन प्रक्रियांवर काही प्रभाव पडत नसणार आणि लक्ष्यित साहित्यात परंपरेने चालत आलेल्या आणि आधीच प्रभावी असलेल्या निकषांनुसार ही भाषांतरे आपले प्रारूप धारण करीत असतात. अशा प्रसंगी भाषांतरित साहित्य हे स्थितिवादाचा मुख्य स्रोत बनते आणि समकालिक मूळ साहित्य मात्र नवीन निकष आणि प्रारूपे विकसित करू शकते, भाषांतरित साहित्य मात्र या नव्याने प्रस्थापित झालेल्या केंद्राने नुकत्याच किंवा आधीच त्याज्य ठरवलेल्या निकषांना चिकटून राहते. मूळ लेखनाशी त्याचा आता काही सकारात्मक संबंध उरत नाही.

एक अतिशय मनोरंजक विरोधाभास इथे साकारताना दिसतो. भाषांतरेही एकीकडे लक्ष्यित साहित्यात नवनव्या कल्पना, घटक आणि लक्षणे आणू शकतात आणि तीच त्यातील पारंपरिक अभिरुची कायम राखण्याचीही साधने बनतात! केंद्रस्थानी असलेले मूळ साहित्य आणि भाषांतरित साहित्य यांच्यामधील ही विसंगती अनेक मार्गांनी उद्‌भवते. उदाहरणार्थ, भाषांतरित साहित्य जेव्हा लक्षित साहित्यव्यवस्थेत केंद्रस्थान ग्रहण करते आणि सोबत नवनवे घटक घेऊन येते तेव्हा काही अवधीतच त्याची त्या व्यवस्थेतील मूळ साहित्याशी नाळ तुटते. ते मूळ साहित्य तर बदलत राहते; पण भाषांतरित साहित्य त्यातल्या रूढीवादी घटकांचे संरक्षक बनते. अशा रीतीने जे साहित्य क्रांतिकारक ठरू शकले असते, ते एक प्रकारचे अस्थिभूत जीर्ण व्यवस्था होऊन बसते, आणि त्यातील दुय्यम प्रारूपे एखाद्या क्षुल्लक बदलालाही आंधळेपणाने विरोध करीत राहतात. ही दुसरी अवस्था उत्पन्न होण्यास कारणीभूत ठरणारी परिस्थिती, ज्या परिस्थितीत भाषांतरित साहित्य केंद्रस्थानी पोचते, त्या परिस्थितीच्या अगदी विरुद्ध असते : एकतर भाषांतरांमुळे लक्ष्यित साहित्यव्यवस्थेत फारसे महत्त्वाचे बदल घडून येत नाहीत किंवा काही बदल घडले असतीलच तर ते काही त्या भाषांतरांचे त्या व्यवस्थेशी जे आंतरवाङ्मयीन संबंध असतात, त्यांच्यामुळे, भाषांतराच्या स्वरूपात निर्माण झालेले नसतात.

भाषांतर हे एकतर केंद्रस्थानी असते किंवा परिघावर असते, हे गृहीतक असे मुळीच सुचवीत नाही की ते संपूर्णपणे त्यापैकी कोणत्यातरी एका जागीच असते. एक व्यवस्था म्हणून भाषांतरित साहित्य हे बहुस्तरीय असते आणि बहुमुखी व्यवस्थेच्या दृष्टिकोनातून जे विश्लेषण केले जाते त्यात सर्व संबंध हे केंद्रीय स्तराच्या परिप्रेक्ष्यातून पाहिले जातात. याचा अर्थ भाषांतरित साहित्याचा काही भाग केंद्रस्थानी असेल तर काही भाग परिघावर रेंगाळत असेल. मागील विश्लेषणांत साहित्यांचा परस्परांशी असलेला संपर्क आणि भाषांतरित साहित्याची स्थिती यांच्यातील घनिष्ठ संबंध मी स्पष्ट केला आहे. या समस्येवरचे ते एक महत्त्वाचे उत्तर आहे असे मला वाटते. तीव्र हस्तक्षेपाच्या परिस्थितीत मुख्य अशा लक्ष्य साहित्यातून आलेला भाषांतरित साहित्याचा भाग केंद्रस्थान पटकावतो. उदाहरणार्थ, दोन महायुद्धांच्या मधल्या काळातील हिब्रू साहित्याच्या बहुमुखी व्यवस्थेत रशियन भाषेतून भाषांतरित झालेल्या साहित्याने निर्णायकपणे केंद्रस्थान पटकावले होते, तर इंग्रजी, जर्मन, पोलिश आणि इतर भाषांमधून आलेल्या साहित्याला परिघावरची जागा मिळाल्याचे स्पष्टपणे दिसून येते. खेरीज, भाषांतरविषयक महत्त्वाचे आणि नावीन्यपूर्ण घाट व निकष या रशियन साहित्याच्या भाषांतरांनीच विस्तृतपणे निर्माण केले असल्यामुळे इतर भाषांमधील भाषांतरे देखील त्यांनाच चिकटून राहिली.

बहुमुखी साहित्यव्यवस्थेतील घडामोडींच्या संदर्भात आतापर्यंत ज्या साहित्याचे विश्लेषण झाले आहे ते, भाषांतरित साहित्य कोणती विशिष्ट जागा ग्रहण करते या संबंधीचे काही दूरगामी परिणाम करणारे निष्कर्ष काढण्यासाठी फारच अपुरे आहे. पण या क्षेत्रात इतर अनेक विद्वानांनी जे कार्य केले आहे ते, तसेच माझे स्वतःचेही संशोधन असेच सुचवते की भाषांतरांचे स्थान 'सामान्यतः' परिघावरचे असते. आणि तत्त्वतः हे सैद्धांतिक अनुमानांशीही जुळणारे असावे. हे मानता येईल की कोणतीही व्यवस्था दीर्घकाळपर्यंत एकाच क्षीण, 'वळणावरच्या' किंवा आणीबाणीच्या अवस्थेत राहणार नाही/राहील असे नाही. पण तरीही काही बहुमुखी व्यवस्थांमध्ये तशी स्थिती बराच काळ राहण्याची शक्यताही नाकारता येत नाही. तसेच, सर्व व्यवस्थांची संरचना एकाच पद्धतीची नसते आणि संस्कृती-संस्कृतींमध्ये महत्त्वाचे भेदभाव असतात. उदाहरणार्थ, फ्रेंच संस्कृती - आणि तीत फ्रेंच साहित्यही निसर्गतःच आले - इतर अनेक व्यवस्थांपेक्षा अधिक ताठर असते हे उघड आहे. या वास्तवाच्या परिणामामुळे भाषांतरित फ्रेंच साहित्याला युरोपीय साहित्याच्या संदर्भात (किंवा युरोपीय बृहत् साहित्यव्यवस्थेच्या अंतर्गत) फारच परिघावरचे स्थान मिळालेले दिसते. तुलनेसाठी अँग्लो-अमेरिकी साहित्य घेता येईल. तसेच रशियन, जर्मन किंवा स्कँडिनेव्हियन साहित्य या संदर्भात भिन्न तऱ्हांनी वागताना दिसेल.

भाषांतरित साहित्याने पटकावलेल्या स्थानाचा भाषांतरविषयक निकष, वर्तन आणि धोरणांवर काय परिणाम होतो? वर म्हटले आहे त्याप्रमाणे भाषांतरित साहित्य आणि मूळ साहित्य यांच्यातील वाङ्मयीन वर्तनभेद हा भाषांतरित साहित्याच्या त्या त्या काळातील स्थानाचा परिणाम असतो. ते जेव्हा केंद्रस्थानी असते तेव्हा त्यांच्यातील सीमारेषा इतक्या धूसर होतात की भाषांतरित साहित्याची वर्गवारी भाषांतरांच्या जवळ जाणाऱ्या आणि भाषांतर-सदृश संहितांनाही कवेत येईल इतकी व्यापक करणे आवश्यक ठरते. भाषांतरविषयक स्थितिशील आणि अनैतिहासिक संकल्पनांच्या आधारे अशा प्रकारच्या घटना नाकारण्यापेक्षा या प्रकारे त्यांना हाताळणे भाषांतरसिद्धांतांच्या दृष्टिकोनातून अधिक प्रशस्त ठरेल असे मला वाटते. भाषांतरित साहित्य हे जेव्हा केंद्रस्थानी असते आणि भाषांतरप्रक्रिया नवीन, प्रधान प्रारूपांची निर्मिती करण्यात गुंतलेली असते; तेव्हा भाषांतरकाराचे मुख्य काम केवळ आपल्या भाषेतील तयार प्रारूपांमध्ये फिट्ट बसतील अशा संहिता भाषांतरासाठी शोधणे, एवढेच नसते. उलट अशा परिस्थितीत भाषांतरकार लक्ष्यित साहित्यातील मानदंडांचे आणि परंपरांचे उल्लंघन करण्यास तयार असतो. अशा प्रसंगी भाषांतर हे पर्याप्ततेच्या परिभाषेत बोलायचे झाले तर, मूळ संहितेच्या अधिक जवळ असण्याची (दुसऱ्या शब्दांत, मूळच्या प्रभावी संहिता-संबंधांची पुनरावृत्ती असण्याची) शक्यता अधिक असते. अर्थातच, भाषांतरांच्या माध्यमातून हे नव्याने अंगीकारले गेलेले निकष लक्ष्यित साहित्याच्या दृष्टिकोनातून परके आणि क्रांतिकारक वाटण्याची शक्यता असते. आणि जर हा नवा कल साहित्यिक संघर्षात पराभूत झाला तर लक्ष्य साहित्याच्या संकल्पना व अभिरुची यांना अनुसरून केले गेलेले हे भाषांतर लक्ष्यित साहित्यात कधीही जम बसवू शकणार नाही. पण जर हा नवा कल विजयी झाला तर भाषांतरित साहित्य अधिक समृद्ध होते आणि त्याची घटक (चिन्ह) व्यवस्था अधिक लवचीक बनते. लक्ष्यित साहित्यव्यवस्थेत फार मोठ्या बदलांचे काळ तेव्हाच येतात, जेव्हा भाषांतरकार प्रस्थापित लक्ष्यित साहित्य घटकांत उपलब्ध असलेल्या पर्यायांच्या खूप पल्याड जाण्यास आणि संहितानिर्मितीची नवी मांडणी करण्यास तयार असतो. जेव्हा परिस्थिती स्थिर असते आणि नवनव्या प्रयोगांत ती बहुमुखी व्यवस्था नाकारत असते, तेव्हा तिच्यात उपलब्ध नसलेले (पण लक्ष्य साहित्यात असलेले) घटकही अपरिवर्तनीय राहू शकतात. पण लक्ष्यित व्यवस्था जसजशी मोकळी होत जाते तसतसे या दोन व्यवस्थांमधले साहित्य एकमेकांच्या सावकाशपणे जवळ यायला लागते आणि अखेर तर अशी परिस्थिती निर्माण होते की भाषांतरीय गृहीततत्त्वे आणि समतुल्यतेचे वास्तव हे घटक फार मोठ्या प्रमाणावर परस्परव्याप्त व्हायला लागतात. युरोपीय साहित्यांत असे घडलेले आढळते. मात्र त्यातल्या काहींमध्ये नकाराची यंत्रणा इतकी प्रबळ होती की मी ज्या बदलांबद्दल बोलतोय ते

त्यांच्यांत फारच मर्यादित प्रमाणावर घडून आलेले दिसतात.

भाषांतरित साहित्य जेव्हा परिघावर असते तेव्हा त्याचे वर्तन अगदी वेगळे असणे स्वाभाविक आहे. अशा स्थितीत भाषांतरकाराचा मुख्य प्रयत्न त्या परकीय संहितेसाठी सर्वोत्तम आयते गौण प्रारूप शोधून काढणे हा असतो. याचा परिणाम प्रायः अपुऱ्या भाषांतरकृतीत होतो किंवा (मी असे म्हणणे जास्त स्वीकार्य मानीन की) साध्य झालेली समतुल्यता आणि गृहीत धरलेली पर्याप्तता यांच्यांत फार मोठी तफावत निर्माण होते.

दुसऱ्या शब्दांत, बहुमुखी व्यवस्थेच्या अंतर्गत भाषांतरित साहित्याची त्याच्या स्थानावर अवलंबून असलेली सामाजिक प्रतिष्ठाच नव्हे तर एकूण भाषांतरव्यवहारच अत्यंत गौण मानला जाऊ लागतो. आणि भाषांतर कशाला म्हणावे या साध्या प्रश्नाचे अनुभवपूर्व उत्तर सुद्धा अशा नैतिहासिक नि:संदर्भ आदर्शीभूत अवस्थेत देता येणे शक्य नसते. ते त्या बहुमुखी व्यवस्थेचे नियंत्रण करणाऱ्या ज्या प्रक्रिया असतील त्यांच्या द्वारेच निश्चित करावे लागेल. या दृष्टिकोनातून पाहिले तर आता भाषांतर ही जिचे स्वरूप आणि सीमा एकदाच व कायमच्या ठरवून टाकता येतात अशी घटना उरत नाही, तर एखाद्या संस्कृतिव्यवस्थेतील संबंधांवर अवलंबून असलेला तो एक [सातत्याने चालत राहाणारा] उपक्रम ठरतो.

**टीप :** १ 'क्षीण' या संकल्पनेसाठी 'इनटरफिअरन्स इन डिपेंडंट लिट्ररी पॉलिसिस्टिम्स' (एव्हिन - झोहर १९९०) हा लेख पाहावा.

**टीप :** २ [ ] अशा कंसातील शब्द अनुवादकाची भर मानावेत. ■

**बोलीकडून प्रमाणभाषेकडे**

ग्राममंगलच्या आदिवासी भागांतील शाळांमध्ये सर्व विद्यार्थी आणि विद्यार्थिनी शाळेच्या आजूबाजूच्या भागातील आणि आर्थिकदृष्ट्या (व सामाजिकदृष्ट्याही) मागासलेल्या समुदायांतील आहेत. अर्थातच मुले आपापली बोली-मातृभाषा त्यांच्या त्यांच्या स्वतंत्र वैशिष्ट्यांसह घेऊन आलेली असतात. या बोलींकडून प्रमाणभाषेकडे जाण्याचा प्रवास प्रत्येकच विद्यार्थी-विद्यार्थिनीला स्वतंत्रपणे करीत जावा लागतो. या प्रवासाला शाळा कशी मदतरूप होईल, हे या शाळेत कटाक्षाने पाहिले जाते. उदाहरणार्थ, त्यांची 'घरची' भाषा मुक्तपणे स्वीकारणे - म्हणजे या भाषेत मुलांना वर्गांमध्येही बोलू देणे, लिहिण्या-वाचण्यातही तिचा वापर करू देणे आवश्यक असते. बोलीच्या वापराचे मुक्त स्वातंत्र्य देऊन विद्यार्थ्यांनाच त्याची प्रमाणभाषेशी सांगड घालण्याची संधी देणे इष्ट असते. त्यामुळे असा मुक्त वापर ही या प्रवासातील शाळेची पहिली पायरी.

- रमेश पानसे, ''निळे आकाश, हिरवी झाडे, काळी माती'', पृ० ३८





अनुक्रमणिका

# आंतरराष्ट्रीय अनुवाद संमेलन : एक अनुभव

अनुराधा मोहनी

अनुवाद ह्या विषयावरील एका आंतरराष्ट्रीय संमेलनासाठी दिल्लीस जाण्याची नुकतीच संधी मिळाली. हे संमेलन 'इंडियन ट्रान्सलेटर्स असोशिएशन' (ह्याला आपण 'भारतीय अनुवादक संघ' म्हणू) आणि 'लिंग्वा इंडिया' अशा दोन संस्थांनी आयोजित केले होते. त्यांना 'पंजाब तंत्र विद्यापीठ', 'इंटरनॅशनल मेडिकल इंटरप्रिटर्स असोशिएशन' अमेरिका, 'इंटरनॅशनल ट्रान्सलेटर्स फेडरेशन', ('आंतरराष्ट्रीय अनुवादक संघ'), स्वित्झर्लंड आणि 'इन्स्तित्यूतो सर्वांतीस' ह्या संस्थांचे पाठबळ लाभले होते. ह्या संस्थांनी अशा प्रकारचे आयोजित केलेले हे तिसरे आंतरराष्ट्रीय संमेलन होते. विषय होता अनुवाद, तंत्रज्ञान व जागतिकीकरण - एका बहुभाषिक परिप्रेक्ष्यात. आयोजकांच्या टिप्पणीत त्यांची भूमिका शब्दांत मांडली होती. ती अशी :

*आजच्या युगात जागतिकीकरणामुळे अनुवाद अनिवार्य झाला आहे. साहित्य आणि सांस्कृतिक देवाणघेवाण ह्यांच्याशिवाय आपली उत्पादने सर्वदूर पोहोचविणाऱ्या कंपन्यांना स्थानिक बाजारपेठांसाठी अनुवादाची आवश्यकता आहे. कोणत्याही उत्पादनाचा आंतरराष्ट्रीय स्वीकार व्हावयाचा असेल, तर त्याचे स्थानिकीकरण आवश्यक असते. आज बदलत्या युगामध्ये अनुवाद, स्थानिकीकरण, माहिती तंत्रज्ञान व तंत्रज्ञान हे परवलीचे शब्द झाले आहेत. भारतातही आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक व्यवस्थांमध्ये घडून आलेले आमूलाग्र परिवर्तन ह्याचेच निदर्शक आहे. त्यानुसार संवादाचे माध्यम असलेल्या भाषेतही - आर्थिक परिप्रेक्ष्यात पाहिले तर - पुष्कळ बदल घडून आला आहे. बदललेल्या अर्थव्यवस्थेमुळे स्थानिक तसेच परक्या भाषा जाणणाऱ्यांचे मोल वाढले आहे. आता अनुवादकांनी जुन्या नैपुण्यावर विसंबून न राहता सतत विकसित होणाऱ्या तंत्रज्ञानाबरोबर आपले भाषाज्ञान वाढवीत राहिले पाहिजे. नव्या मनूची नवीन आव्हाने स्वीकारण्यास सज्ज राहिले पाहिजे. संमेलनात जागतिकीकरणाबरोबरच अनुवाद शिकवण्यातील आव्हाने व अनुवादकांची व्यावसायिक दृष्ट्या वाढ ह्यावरही प्रकाश टाकण्यात येईल.*

आयटीएचे अध्यक्ष श्री० रवि कुमार, सचिव श्रीमती जसप्रीत कौर व इतर सहकाऱ्यांनी अतिशय मेहनत घेऊन कार्यक्रमाचे देखणे आयोजन केले होते. चार दिवसांचा संपूर्ण कार्यक्रम नीटनेटका, शिस्तीत पार पडला. लिंग्वा इंडिया ही २००६पासून कार्यरत असलेली भाषा, संस्कृती व अनुवाद ह्यांच्या कामाला स्थानिक, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय

पातळीवरून चालना देणारी संस्था आहे. जगाच्या कानाकोपऱ्यांतील १५,००० अनुवादक व भाषातज्ज्ञ त्यामध्ये सामील झाले आहेत. त्यामधून तज्ज्ञांचा गट तयार करण्यात आला असून असमिया, बंगाली, हिंदी, गुजराथी, तमिळ, कन्नड, मराठी, तेलुगु, मलयालम पंजाबी, कोंकणी, ओडिआ, संस्कृत, नेपाली, ऊर्दू, काश्मिरी व मैथिली ह्या भारतीय भाषांमधील परस्पर अनुवादाचे काम त्यांच्याकरवी केले जाते.

'भारतीय अनुवादक संघ' व 'लिंग्वा इंडिया' ह्या दोन्ही संस्थांचे संस्थापक रवि कुमार हे 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ फॉरिन ट्रेड'मधील स्पॅनिशचे अध्यापक व आंतरराष्ट्रीय अनुवाद संघाचे भूतपूर्व सदस्य आहेत. जगभरातील ७२ देशांमधील ११० अनुवादक संघटनांचा मिळून बनलेला हा शिखर संघ आहे. अमेरिकेतील आंतरराष्ट्रीय वैद्यकीय अनुवादक संघाचे ते भारतीय प्रतिनिधी असून भाषा इंडियाने ('मायक्रोसॉफ्ट इंडिया'चा भारतीय भाषा विभाग) त्यांच्या कामासाठी विशेष मान्यता दिली आहे. स्पॅनिशमध्ये एम०ए० आणि एम०फिल० केलेले रवि कुमार अनुवाद व भाषा व्यवसायाला चालना देण्याचे अनेक प्रयोग करीत असतात.

कॅनॉट प्लेसमधील हनुमान रोडवरील 'इन्स्तित्यूतो सर्वांतीस' ह्या संस्थेत संमेलन पार पडले. स्पॅनिश भाषा, संस्कृती व शिक्षण ह्यांच्या प्रचार-प्रसारासाठी त्या देशाच्या अधिनियमान्वये स्थापन केलेली ही संस्था म्हणजे भारतातील स्पॅनिश दूतावासाचे अधिकृत सांस्कृतिक केंद्र आहे. संस्थेचे संचालक ऑस्कर पुजॉल हेच संमेलनाचे यजमान होते. पुजॉल ह्यांनी बनारस हिंदू विद्यापीठात १७ वर्षे राहून स्पेनी भाषेचे अध्यापन केले व संस्कृतमध्ये पीएच०डी० संपादन केली. सुमारे साठ हजार नोंदींचा संस्कृत-कॅटलन (कॅटलोनिया हा ईशान्य स्पेनमधील एक प्रांत आहे) शब्दकोश हे त्यांचे ह्या क्षेत्रातील मोठे योगदान आहे. हा कोश पूर्ण करण्यास त्यांना बारा वर्षांचा काळ लागला. इ०स० २००९मध्ये 'इन्स्तित्यूतो सर्वांतीस'ची स्थापना करून त्यांनी भारतातील स्पेनी शिक्षणाची मुहूर्तमेढ रोवली.

तेवीस जून रोजी दोनशेहून अधिक अनुवादक व भाषाविद यांच्या उपस्थितीत संमेलनाचे उद्घाटन पार पडले. ह्या कार्यक्रमासाठी चार कुलगुरू एकत्र आले होते. पंजाब तंत्र विद्यापीठातर्फे डॉ० प्रभज्योत कौर, माखनलाल चतुर्वेदी राष्ट्रीय पत्रकारिता व संवादन विद्यापीठाचे कुलगुरू डॉ० ब्रजकिशोर कुथियाला, केरळ केंद्रीय विद्यापीठाच्या कुलगुरू डॉ० जॅन्सी जेम्स व शिक्षा संस्कृती उत्थान न्यासाचे राष्ट्रीय सचिव श्री० अतुल कोठारी, कोलंबियाचे भारतातील राजदूत श्री० जुआन पिंटो सावेदरा हे प्रमुख अतिथी होते. सर्व मान्यवरांनी राष्ट्राच्या सामाजिक व आर्थिक उन्नतीसाठी अनुवादाची आवश्यकता ह्यावर भर दिला. डॉ० प्रभज्योत कौर ह्यांनी पंजाब तंत्र विद्यापीठामध्ये तांत्रिक अनुवाद व अर्थउकल ह्या विषयावरचे बी०एस्सी० व स्नातकोत्तर पदविका अभ्यासक्रम सुरू करीत

असल्याचे जाहीर केले. श्री० रवि कुमार ह्यांनी संपादित केलेल्या 'रोल ऑफ ट्रान्सलेशन इन नेशन बिल्डिंग' ह्या पुस्तकाचे प्रकाशन करण्यात आले. हे पुस्तक भारतातील अनुवाद विद्येसाठी पाठ्यपुस्तक म्हणून नेमले जावे असे मत व्यक्त करण्यात आले. ह्यावेळी अतुल कोठारी ह्यांनी आवर्जून हिंदीत भाषण केले. भाषणाच्या सुरुवातीला ओंकार व तमसो मा चा श्रोत्यांसहित जप केला. त्यांच्याकडून स्फूर्ती घेऊन जुआन सावेदरा ह्यांनीही स्पॅनिशमधून भाषण केले. दोन्ही भाषणे रवि कुमार ह्यांनी अनुवादित केली.

संध्याकाळच्या सत्रात 'की-नोट' वक्त्यांची भाषणे झाली. डॉ० मनीरत ह्या थायलंडच्या. त्यांनी नुकत्याच स्थापन झालेल्या 'आशियाई अनुवाद उद्योग संघा'बद्दल माहिती सांगितली. आशियातील अनुवादक व भाषांतरकार ह्यांचा परस्पर-संवाद वाढविण्याच्या उद्देशाने स्थापन करण्यात आलेल्या ह्या संघाचे सदस्यत्व चीन, कंबोडिया, हाँगकाँग, भारत, इंडोनेशिया, लाओस, मलेशिया, म्यानमार, नेपाळ, फिलिपाइन्स, थायलंड व व्हिएतनाम ह्या देशांमधील अनुवादकांनी घेतले आहे. डॉ० मनीरत ह्या संघाच्या संस्थापक सदस्य व थायलंडच्या भाषाधोरणाच्या कर्त्या आहेत. पूर्णेन्द्र किशोर ह्यांनी, अनुवादाची कौशल्ये वापरून भारत २०२२पर्यंत महासत्ता कसा होऊ शकेल ह्यावर विचार मांडले. भारतातील अनेक साधे-सोपे व्यवसाय करणाऱ्यांना त्यांच्या भाषेत माहिती दिली गेली, तर ते कसे ऊर्जितावस्थेत येतील, ह्याचे रसाळ विवेचन त्यांनी केले. सर्व-सामान्यांच्या सबलीकरणासाठी अनुवाद-कौशल्याचा वापर ह्यावर त्यांचा भर होता. यंत्र अभियांत्रिकीत बी०टेक० व अनेक नामांकित कंपन्यांमध्ये काम केल्यानंतर आता ते शिक्षण क्षेत्राकडे वळले असून विविध तंत्रे व आधुनिक तंत्रज्ञान ह्यांचा वापर करून शिक्षण-प्रशिक्षणात सर्वोत्कृष्ट परिणाम साध्य करणे, हे त्यांचे उद्दिष्ट आहे.

अशा रीतीने उद्घाटन सोहळा संपन्न झाल्यानंतर दि० २४पासून शोध-निबंध वाचनाला सुरुवात झाली.

(१) जागतिकीकरण, आंतरराष्ट्रीयीकरण, स्थानिकीकरण व अनुवाद

(२) अनुवाद आणि भाषांतराचे शिक्षण-प्रशिक्षण

(३) विशेषीकृत पाठाचा (शास्त्रीय, तांत्रिक, वैद्यकीय इ०) अनुवाद

(४) प्रकाशन व्यवसाय व अनुवाद (कॉपीराइट व इतर घटक)

(५) अनुवादाची यांत्रिक साधने

हे मुख्य विषय म्हणून नेमून देण्यात आले होते. ते व त्यांच्या अंतर्गत येणाऱ्या विविध विषयांवर सुमारे नव्वद जणांनी शोध-निबंधांमधून आपापले विचार मांडले. दिल्ली येथील पत्रकार व माध्यमतज्ज्ञ ओम गुप्ता ह्यांनी भारत सरकारच्या हिंदी अनुवादाच्या धोरणावर (व एकंदरीत हिंदीवरच) सडकून टीका केली. ही हिंदी म्हणजे आपल्या देशाची खरी भाषा नाही. स्वातंत्र्यानंतर एका रात्रीतून घडविण्यात आलेली ती एक वेगळीच

संस्कृतप्रचुर भाषा आहे असे त्यांचे मत होते. त्यांचा विशेष रोख एन०सी०ई०आर०टी०च्या पुस्तकांवर होता. ती भाषा वाचून आपल्या घरातील मुलेबाळे बाबा, 'इसका हिंदी में करके हमें बताओ' असे म्हणतात अशी त्यांनी तक्रार केली. ओम गुप्ता हे गेल्या ४३ वर्षांपासून द्विभाषिक जन-संवादक आहेत. ('हंड्रेड इयर्स ऑफ सॉलिट्यूड' ही गॅब्रिएला गार्शिया मार्क्स ह्यांच्या कादंबरीचा हिंदी अनुवाद करून त्यांनी तो 'दै० भास्कर'मधून क्रमशः प्रकाशित केला. 'इंडो-लॅटिन अमेरिकन फाइल' हे मासिक १० वर्षे चालविले.)

बेल्जियमहून आलेल्या जॅन न्यूकेन्स ह्यांनी विविध विषयक्षेत्रांमधील ज्ञान एका भाषेतून दुसऱ्या भाषेत नेताना 'सांडू' नये म्हणून करावयाच्या शब्दकोश व इतर उपाययोजनांची चर्चा केली. पंचाहत्तरी ओलांडलेले न्यूकेन्स हे डच, फ्लेमिश व युरोपियन भाषा संघाचे सदस्य आहेत.

नायजेरियन प्राध्यापक डॉ० श्रीमती दिनातु इवाला ह्यांनी विकसनशील देशांमध्ये तंत्रज्ञान हस्तांतरित करताना अनुवादाचे महत्त्व काय असते ते विशद केले. भाषेशिवाय आणलेले तंत्रज्ञान हे कधीकधी निरुपयोगी वा घातकही ठरू शकते. फ्रान्सने एक शेतकी विकास प्रकल्प नायजेरियाकडे हस्तांतरित केला, त्या प्रकल्पामुळे शेतीचा विकास होऊन पेट्रोलियमवरचे अवलंबित्व कमी होईल अशी नायजेरियन सरकारला आशा होती. त्याविषयीचे दस्तऐवज फ्रेंचमधून इंग्रजीत आणताना कशाकशाचा विचार करावा लागला त्याबद्दलचे अनुभव त्यांनी मांडले. (केस स्टडी), दिनातु ह्या फ्रेंच भाषेच्या डॉक्टरेट आहेत.

कोविलपट्टीच्या बामरुक्मणी ह्यांनी आपल्या निबंधातून क्रॉस लँग्वेज इनफरमेशन रिट्रीव्हल - सी०एल०आय०आर०-ची माहिती दिली. भारतामध्ये बावीस अधिकृत व जवळपास चारशे इतर सजीव भाषा आहेत. ह्या साऱ्यांना एकत्र बांधणारी व्यवस्था आवश्यक आहे. जसे की, शेती हा भारतवर्षातील महत्त्वाचा व्यवसाय आहे. त्यासंदर्भात, वेगवेगळ्या राज्यांतील शेतकऱ्यांना आपापली व इतरांची पिके, लागवडपद्धती, समस्या ह्यांच्याबद्दल एकमेकांशी विचारविनिमय करता आला पाहिजे. परंतु हे शक्य होत नाही, कारण तामिळनाडूमधील शेतकरी फक्त तमिळच जाणतो. तर ही अडचण दूर करण्याच्या उद्देशाने, तमिळ-इंग्रजी अनुवाद करण्यासाठी हे मॉडेल तयार करण्यात आले आहे. (बामरुक्मणी ह्या तेथील अभियांत्रिकी महाविद्यालयात संगणकशास्त्राच्या प्राध्यापक आहेत.)

तेनाली (आं०प्र०) येथील महिला महाविद्यालयातील इंग्रजीच्या प्राध्यापक के०पी० शायनी ह्यांनी 'जागतिकीकरणाच्या युगातील इंग्रजीचा प्रभाव' ह्यावर भाषण दिले. जगाच्या सांस्कृतिक, शैक्षणिक, राजकीय व्यवस्थांवर आधीच होत असलेला

जागतिकीकरणाचा प्रखर परिणाम प्रसार माध्यमांनी द्विगुणित केला आहे. त्यामुळे खऱ्या आधुनिकीकरणापेक्षा पाश्चात्त्यीकरणाकडेच लोकांचा ओढा वाढला आहे. इंग्रजीचे स्तोम प्रमाणाबाहेर वाढल्यामुळे अनेक देशांच्या मूळ भाषांवर विपरीत परिणाम होऊन भाषिक वसाहतवादाचे युग आल्याचे मत त्यांनी मांडले. आपल्या स्वत:च्या भाषा-संस्कृतीकडे लोकांनी पाठ फिरवू नये म्हणून इंग्रजीचे वेगळ्या पद्धतीने अध्ययन-अध्यापन करावे लागेल, असेही त्या म्हणाल्या.

यंत्र अभियंता हरी रविकुमार व शास्त्रज्ञ कोटी श्रीकृष्ण ह्यांनी भगवद्गीतेचे ओघवत्या इंग्रजीत अनुवाद करताना आलेले अनुभव मांडले. 'टाइमलेस विस्डम इन द लँग्वेज् ऑफ अवर टाइम्स' असे त्यांच्या पुस्तकाचे नाव आहे.

दीपाली शुक्ल ह्या भोपाळच्या सामाजिक कार्यकर्त्या. तेथील एकलव्य गटात त्या काम करतात. चित्रकथा व इतर बालवाङ्मय ह्याच्या इंग्रजी-हिंदी व त्याउलट अनुवाद ह्या विषयावर त्यांनी सादरीकरण केले. अनेक उदाहरणे देऊन त्यातील चुकीचे शब्द व अधिक बरोबर शब्द ह्यांची नोंद करीत त्यांनी प्रत्ययकारी मांडणी केली.

डॉ० नीलाभ तिवारी हे भोपाळच्याच राष्ट्रीय संस्कृत संस्थानचे प्राध्यापक. त्यांनी आपल्या मुद्द्याची संस्कृतमध्ये अप्रतिम मांडणी केली. 'संस्कृत भाषेच्या अवनतीमध्ये व्याकरण अनुवाद पद्धतीची भूमिका' ह्या विषयावर ते बोलले. 'भाषा' हा शब्द भाष् धातूपासून आला असल्यामुळे, जी बोलली जाते, ती(च) भाषा. संस्कृत ही फार पूर्वी आपल्या देशात संवादाची भाषा होती. परंतु नंतर इंग्रज येईपर्यंत तिचा वापर कमी झाला. मॅकोलेप्रणित शिक्षणपद्धतीत तर व्याकरण घोटून पाठ करणे हेच संस्कृत अध्ययनाचे स्वरूप बनले. भाषा बोलणे व ऐकणे बादच झाले. निव्वळ वाचण्या-लिहिण्याने भाषा कशी येईल? रामः रामौ रामाः आणि अहम् आवाम् वयम् हे घोकता घोकता संस्कृतमधील शब्दसौंदर्य, अर्थचमत्कृतीचा लोप होऊन एक नीरस, रूक्ष भाषा मुलांच्या माथी मारली जाते. परिणामी पाच वर्षे संस्कृत शिकलेला विद्यार्थीही पाच वाक्ये साध्या संस्कृतातून बोलू शकत नाही. तसेच ह्यामुळे एका सुघटित, अमृतमय भाषेला निव्वळ अनुवादाच्या पातळीवर आणून ठेवण्यात आले आहे. नीलाभ ह्यांनी सोप्या भाषेत, हावभावांसह इतके सुंदर विवेचन केले, की तेथे उपस्थित असलेल्या भारतीयांना तरी ते नक्कीच समजले असेल.

बहराम मोघद्दास हे हैदराबादच्या उस्मानिया विद्यापीठातील संशोधक. त्यांचा निबंधही लक्षणीय होता. 'इराणी-इंग्रजी अनुवाद अचूकतेवर लिंगभावाचा प्रभाव' ह्या विषयावर त्यांनी मांडणी केली. पुरुषांनी केलेला अनुवाद अधिक अचूक असतो असा एक समज प्रचलित आहे. त्यावर संशोधन करण्यासाठी त्यांनी सहा इंग्रजी कादंबऱ्या व त्यांचे इराणी अनुवाद ह्यांची निवड केली. त्यातील साधे पूर्ण वाक्य हे तुलनेचे युनिट

ठरवले. चुकीचा अनुवाद झालेल्या वाक्यांचा, अनुवादित मजकुराच्या आशय आकलनावर काय परिणाम होतो ह्याचाही बारकाईने अभ्यास केला. नंतर स्त्री व पुरुषांनी केलेल्या चुकांची स्वतंत्रपणे बेरीज करून त्यांची तुलना करण्यात आली. शेवटी 'हायपोथिसिस वॉज रिजेक्टेड.' स्त्रियाही पुरुषांइतक्याच अचूक अनुवाद करतात. बहराम ह्यांनी अत्यंत शास्त्रशुद्ध संशोधन व नेटके सादरीकरण केले होतेच; परंतु त्यांच्या निष्कर्षामुळे मला ते अधिक भावले, हेही तितकेच खरे.

इंदिरा गांधी मुक्त विद्यापीठाचे डॉ० मुहम्मद सलीम ह्यांनी काव्याचा अनुवाद ह्यासारख्या गहन विषयाला हात घातला. त्याच-तशाच ताकदीच्या माणसाने दुसऱ्या भाषेत त्याची पुनर्निर्मिती केल्याशिवाय काव्याचा अनुवाद होऊ शकत नाही असे ते म्हणाले. काव्याचा अर्थ तोच आहे, कवीला तोच अभिप्रेत आहे, हे आपण कसे खात्रीपूर्वक समजणार? तसेच, त्याच्या काळात कसे समजले जात होते, हे आपल्याला कळायला मार्ग काय? आपल्या मनातील अर्थ त्याच्यावर लादणे कसे टाळावे? यासारखे अनेक प्रश्न उपस्थित करून त्यांनी श्रोत्यांना अंतर्मुख केले. त्यानंतरची चर्चाही बरीच रंगली. विषय तसा जिव्हाळ्याचाच होता. कोणतेही काव्य ती भाषा न जाणणाऱ्यांपर्यंत पोहोचविण्याचा, अनुवाद हा एकमेव मार्ग आहे.

महाराष्ट्रातून माझ्याशिवाय सहा वक्ते होते. पुण्याच्या भाषा अभियंता लीना सातपुते ह्यांनी यांत्रिक अनुवादाच्या साधनांची माहिती दिली. कोल्हापूरचे प्रा० बाळासाहेब लाडगावकर ह्यांनी अंतोनी चेकोव्हच्या लघुकथेचे 'ड्रामा' नावाच्या इंग्रजी एकांकिकेत रूपांतर केल्यानंतर त्याचा मराठी अनुवाद करताना आलेले अनुभव कथन केले. वाईच्या सुनील सावंत ह्यांनी अनुवादशास्त्राची माहिती दिली. 'सीडॅक' पुणेचे रजत गुप्ता ह्यांनी युनिकोड व आस्की ह्याबद्दल चांगली माहिती दिली. वाईचेच डॉ० सरदार मुजावर ह्यांनी, चांगला अनुवाद बनण्यासाठी प्रतिभा, विद्वत्ता, विनय, व्युत्पत्ती, अभ्यास हे गुण आवश्यक असल्याचे सांगून अनुवाद हा केवळ राष्ट्रीयताच नाही, तर मानवता व विश्वबंधुत्व ह्या गुणांचा परिपोष करतो असे प्रतिपादन केले. विशेष म्हणजे त्यांनी हिंदीतून सादरीकरण व भाषण केले. कणकवलीच्या अण्णासाहेब फरकाटे ह्यांनी काव्यानुवाद शिकवण्यातील समस्यांचे विवेचन केले.

संमेलनात केस स्टडी स्वरूपाची, औद्योगिक अनुवादातील अडचणींवर, अध्यापनातील अडचणींवर अनेक भाषणे झाली. जागतिकीकरणाची प्रवाहपतित व कोरडी सैद्धान्तिक मांडणी करणारेही बरेच होते. चार-पाच अपवाद सोडले तर सर्व भाषणे इंग्रजीत झाली.

संमेलनातील शोध-निबंधांशिवाय सभागृहाच्या बाहेरील ओळखी, भेटीगाठी, चहा, गप्पा महत्त्वाच्या असतात. त्यांचीही दखल घ्यावीच लागेल. दिल्लीतील एक अधिकारी

श्री० रॉय संमेलनास श्रोते म्हणून आले होते. ते काही काळ महाराष्ट्रात नोकरीस होते. त्यांनी मोकळ्या वेळेत मला प्रश्न केला, की मराठी नि कोंकणीमध्ये काय फरक आहे? त्यावर मी कागद-पेन्सिल घेऊन महाराष्ट्र, कोकण, गोवा ह्यांचा (वेडावाकडा) नकाशा काढून जमेल तेवढे हौसेने समजावून सांगितले. बोलता बोलता गाडी मराठी-बंगालीकडे वळली. तेव्हा दोहों भाषांतील काही साम्य-भेद स्थळांची मी त्यांच्याशी चर्चा केली. त्यावरून ते प्रभावित झाले असावेत. दुसऱ्या दिवशी सकाळी ते रस्त्यावरच भेटले. माझ्यासाठी बंगाली वर्तमानपत्र घेऊन आले होते. म्हणाले, ''मला आज काम आहे. समारोपाच्या कार्यक्रमाला येऊ शकणार नाही. खरे तर तुम्हाला हे देण्यासाठीच आलो होतो. तुम्हाला तिकडे बंगाली वाचायला मिळत नसेल ना? हे घ्या. निदान मथळे तरी वाचा.'' रस्त्याच्या कडेला उभे राहून त्यांनी एक-दोन मथळे माझ्याकडून वाचून घेतले, आणि तेथून परत फिरले.

तमिल सेल्वन नावाच्या एका तरुण वक्त्याला मी त्याच्या नावाबद्दल विचारले. ''हे भाषेचे नाव तुला कसे दिले?'' त्यावर तो म्हणाला, ''माझे नाव तिलतामिल असे आहे. त्याचा अर्थ तमिळ (भाषा, संस्कृती) हीच ज्याची संपत्ती आहे, असा होतो. माझ्या वडिलांनी मोठ्या कौतुकाने मला हे नाव दिले होते.'' ''मग तू स्पॅनिशकडे कसा वळलास?'' मी विचारले. (तमिल हा स्पॅनिशमध्ये एम्०ए० व पोर्तुगीजमध्ये एम्०फिल्० असून बँकिंग, विमा क्षेत्रांसाठी सॉफ्टवेअर तयार करतो.) ''ते करण्यावाचून मला काही इलाजच नव्हता. कारण मला तसा दृष्टान्त झाला होता.'' मला काहीच कळले नाही. मग तोच पुढे म्हणाला, ''पेरियार कॉलेजला प्रवेश घेऊन स्पॅनिश शिकण्याबाबत मला दृष्टान्त झाला होता. खरे तर माझा तसा काहीच विचार नव्हता आणि पेरियार कॉलेजच्या प्रवेशाची तारीखही निघून गेली होती. तरीही मी खूप प्रयत्न केला आणि मला प्रवेश मिळाला. काय करणार! जीझसची आज्ञा मी टाळूच शकत नव्हतो ना...'' माझ्या मनात विचार आला, महाराष्ट्रातील देवदेवता येथील तरुणांना कोणतीही परकीय वा स्वत:चीही भाषा आवडीने शिकवण्यासाठी दृष्टान्त देतील का?

केंद्रीय अधिनियमांच्या मराठी अनुवादावरचे माझे सादरीकरण पंजाब विद्यापीठाच्या प्रभज्योत कौर ह्यांनी काळजीपूर्वक ऐकून घेतले. मराठीतील अधिनियम दाखवण्यासाठी मी त्याची दोन पुस्तके बरोबर नेली होती. त्यातील एक वास्तुशास्त्रज्ञ अधिनियम - 'द आर्किटेक्ट्स ॲक्ट' हा होता. प्रभज्योत स्वतः वास्तुशास्त्रज्ञ आहेत. त्यांनी तो हातात घेऊन कौतुकाने न्याहाळला आणि नंतर माझ्याकडून आग्रहाने मागूनच घेतला. ''मी हा माझ्या विद्यार्थ्यांना दाखवीन. त्यांना पंजाबीतून असे काम करण्यास उद्युक्त करीन.'' त्या म्हणाल्या.

माझ्या सादरीकरणानंतर परदेशी पाहुण्यांमध्ये चलबिचल सुरू झाली. ''तुमच्या

देशात तुमच्या भाषेतून न्यायदान होत नाही ही आश्चर्याची गोष्ट आहे.'' ही त्यांची पहिली प्रतिक्रिया होती. ''ह्यासाठी तर सरकारलाच न्यायालयात खेचले पाहिजे.'' एक आफ्रिकन म्हणाला. दुसऱ्या एका युरोपिअन सद्गृहस्थाने माहिती पुरवली, की युरोपातील देशातंही इंग्रजी ही सार्वत्रिकपणे न्यायदानाची भाषा नाही.

जॅन न्युकेन्स ह्यांच्या शेजारी बसलेल्या, लांब झगा घातलेल्या एका वृद्धेला मी विचारले, ''आपण ह्यांच्याबरोबर आलात काय?'' ''होय, मी ह्यांच्याबरोबरच आले आहे, कारण गेली ४५ वर्षे मी ह्यांच्याच बरोबर आहे.'' बारीक केस कापलेल्या त्या लोभस चेहऱ्याच्या बाई म्हणाल्या. त्यावर आम्ही दोघीही मनमुराद हसलो. पूर्वी त्या शाळेत भाषा विषयाच्या शिक्षिका होत्या. त्यांच्याशी झालेल्या गप्पांमध्ये, मातृभाषेला पर्याय नाही ह्यावर आमचे एकमत झाले; पण इंग्रजी येत असल्यामुळे आम्ही इथे संवाद साधू शकलो ह्याची आम्हांला जाणीव होतीच.

संमेलनातील सहभाग हा एक समृद्ध करणारा अनुभव होता, ह्यात शंकाच नाही. पण त्यातील विभिन्न विषयांवर विनाक्रम ठेवलेली भाषणे, मला एका जवळजवळ चिकटवलेल्या वेगवेगळ्या चित्रांसारखी वाटली. समग्रतेचा अनुभव व भाषाविचाराला निश्चित दिशा त्यातून मिळू शकली नाही. आयोजक व वक्ते ह्यांनी जागतिकीकरण व उद्योगजगत ह्यांना जास्त महत्त्व दिल्याचाही हा परिणाम असावा. ते साहजिकच होते; कारण त्यांना विषयच तो दिला होता ना... त्यापेक्षा, अधिक खोलात जाऊन, स्वत:ची आपली भाषा, परिसराची भाषा, राष्ट्राची सामायिक भाषा, आंतरराष्ट्रीय विनिमयाची भाषा अशी स्तरीय रचना करून त्यांच्या परस्परसंबंधांचे विवेचन व त्या परिप्रेक्ष्यात अनुवादाचे महत्त्व व स्थान अशा प्रकारे तो विषय मांडला गेला असता, तर काहीतरी अधिक विधायक घडले असते. जागतिकीकरण हा आपल्या डोक्यावर येऊन कोसळलेला विषय आहे. भाषा ही मातीतून उगवणारी गोष्ट आहे. त्यांची सांगड फार विचारपूर्वक घालावी लागेल. जागतिकीकरणात अनुवादाला असलेला वाव हा विषय जागतिकीकरणाच्या युगात अनुवादातून पैसे कमावण्यास असलेला वाव ह्याच्या पलीकडे कसा काय जाणार? ■





अनुक्रमणिका

# मराठीतून कायदा : लोकशाहीचा आधारस्तंभ

अनुराधा मोहनी

हा निबंध मुख्यत: कायद्याच्या भाषेशी संबंधित आहे. कायद्याची भाषा ही अधिनियम (कायदे), निर्णयविधी, न्यायनिर्णय व इतर कायदेविषयक कागदपत्रे ह्या सर्वांच्या भाषेची मिळून बनलेली असते. याशिवाय, कायदेविषयक परिभाषा आणि उपरोक्त दस्तऐवजांच्या मसुद्याची शैली यांचाही तीमध्ये समावेश होतो.

कायदे वा अधिनियम ह्यांचा मसुदा तयार करणे हे काम अनिवार्यपणे राष्ट्राचा विशेषाधिकार व त्याची जबाबदारी आहे. अधिनियम हे संसदेत तयार होतात. संसद हे राष्ट्राचे शासनांग व सर्वोच्च कार्यालय होय. त्यामुळेच अधिनियमाला, समाजात प्रचलित असलेल्या सर्व नियमांमध्ये अधिकाराने सर्वश्रेष्ठ असे स्थान मिळते. त्याच कारणाने त्याच्या अनुवादाची जबाबदारी अनिवार्यपणे सरकारकडे - राष्ट्राच्या कार्यकारी अंगाकडे - येते. त्याची यथायोग्य अर्थउकल करून व नेमकी परिभाषा वापरून अनुवाद होणे आवश्यक असल्यामुळे, अनुवाद खाजगी अनुवादकांकडून करून घेतला, तरी त्याची काटेकोरपणे तपासणी करून त्याला अधिकृतता प्रदान करणे; हे मात्र सरकारचेच काम असावयास हवे.

भारताची न्यायव्यवस्था ही इंग्रजांच्या न्यायव्यवस्थेकडून उधार घेतलेली आणि तीवर आधारलेली अशी आहे. तिचा पायाचा त्यांनी रचला होता. आज आपल्या न्यायव्यवस्थेतील पायाभूत मानले गेलेले, त्यांनी रचलेले अधिनियम (साक्षीपुरावा अधिनियम, कारखाना अधिनियम, भारतीय दिवाणी व फौजदारी संहिता इ०) हे इंग्रजीतच लिहिले गेले. आजही आपले राज्य व केंद्रीय अधिनियम त्याच भाषेत व शैलीत लिहून आपण वसाहतवादाची ओळख जपत आहोत. हे कायदे मागाहून हिंदी वा अन्य भारतीय भाषांमध्ये अनुवादित केले जातात. न्यायविषयक साहित्याचा गाभा व अधिकांश भाग असलेले इतर सर्व दस्तऐवज - न्यायालयात दाखल करावयाच्या विनंतीअर्जापासून न्यायनिर्णय व निर्णयविधीपर्यंत ह्यांचे मसुदे आणि लेखन इंग्रजीतूनच केले जाते. आज आपली न्यायिक चिंतनाची भाषा इंग्रजीच आहे. ह्यामुळे न्यायव्यवस्थेचे संपूर्ण क्षेत्र सामान्य माणसाच्या आवाक्यापासून दूर राहिले आहे. तो जर आपल्या भाषेत दाद मागू शकत नसेल वा तथाकथित न्याय त्याला त्याच्या भाषेत मिळत नसेल, तर देशाच्या न्यायव्यवस्थेचा उद्देश साध्य झाला असे कसे बरे म्हणता येईल?... तर ही झाली न्यायिक दस्तऐवजांचा अनुवाद का आवश्यक आहे, ह्याची पार्श्वभूमी.

**अधिनियमाच्या अनुवादाची प्रक्रिया** - अधिनियमांचा इंग्रजीतून मराठीत अनुवाद, हा मुख्यत: ह्या निबंधाचा विषय आहे. ह्यांमध्ये केंद्रीय व राज्य अधिनियमांचा समावेश आहे. त्यापैकी केंद्रीय अधिनियमांची प्रक्रिया प्रथम उलगडून दाखवते. विधेयकाचा मसुदा प्रथम इंग्रजीत तयार करून तो, त्याच्या हिंदी अनुवादासह संसदेत मांडला जातो. काही दुरुस्त्या व शिफारशींसह विधेयक संमत केले जाते, व त्याचा अधिनियम बनतो. प्रथम इंग्रजीत आणि नंतर त्या दुरुस्त्या हिंदी मसुद्यात (ह्याचे शास्त्रीय नाव प्रारूप) केल्यावर हिंदीत. त्यानंतर हे दोन्ही अधिनियम एकाच वेळी वेगवेगळ्या राजपत्रात प्रसिद्ध केले जातात. मागाहून ते एका निळ्या मुखपृष्ठाच्या पुस्तकात डिग-लॉट स्वरूपात (डाव्या पानावर इंग्रजी व उजव्या पानावर त्याचा हिंदी अनुवाद) प्रकाशित केले जाते. ह्या पुस्तकाला कायद्याचे पुनर्मुद्रित असे म्हटले जाते, कारण ते प्रथम राजपत्रात प्रकाशित झाले होते. हा हिंदी अनुवाद अधिकृत मानला जातो. इतका की, त्याला मूळ अधिनियमाचा दर्जा दिलेला आहे. तथापि, हिंदी अधिनियम न्यायालयात उद्धृत केल्याचे एकही उदाहरण मला माहीत नाही. तसेच हिंदीतून कायदा वाचणारा वा त्यातून संदर्भ पाहणारा एखादा वकील वा न्यायाधीशही मला माहीत नाही. परंतु एकचतुर्थांश डेमी आकाराचे हे पुस्तक म्हणजे कायद्याचे सर्वात अधिकृत रूप आहे हे मात्र खरे.

केंद्रीय अधिनियमांचा स्थानिक भाषेत अनुवाद करण्याची प्रक्रियादेखील अशीच आहे. निवडक कायद्याचेच अनुवाद केले जातात. त्यासाठी प्रत्येक राज्यात कार्यालये निर्माण करून त्यांच्यावर ही जबाबदारी सोपविण्यात आली आहे. महाराष्ट्रात तिचे नाव भाषा संचालनालय असे आहे. ह्या संचालनालयातील तज्ज्ञ अनुवादकांकडून प्रथम त्याचा अनुवाद केला जातो. त्यानंतर तिथल्याच अधिकाऱ्यांकडून तपासणी व शेवटी दिल्लीतील केंद्र शासकीय अधिकाऱ्यांकडून विधीक्षा (उच्च स्तरावरून तपासणी) केली जाते. ह्या अधिकाऱ्यांमध्ये विविध भारतीय भाषांचे अधिकारी असतात. अधिनियमामधील विभिन्न पारिभाषिक संज्ञांचा विचार करून प्रत्येक भाषेत त्यांचा नेमका पर्याय निवडण्यासाठी नियमित बैठका घेतल्या जातात. कोणत्याही एका इंग्रजी शब्दासाठी घेतलेल्या सर्व भारतीय भाषांमधील पर्यायांमध्ये सुसूत्रता आणणे हे त्यांचे कार्य असते. बैठकीनंतर, पारिभाषिक संज्ञांचे स्वीकृत पर्याय घालून अनुवादाचा नव्याने मसुदा बनवला जातो. पुन:पुन्हा वाचून पूर्णत: निर्दोष होत्साता तो मसुदा मा० राष्ट्रपतींच्या स्वाक्षरीसाठी पाठवला जातो. त्यांची स्वाक्षरी झाल्यावर त्याला मूळ अधिनियमाचा दर्जा मिळतो. मग तो प्रथम राजपत्रात व त्यानंतर पुनर्मुद्रित म्हणून पुस्तकरूपाने प्रकाशित होतो. परंतु वापर होण्याच्या बाबतीतली इतर स्थानिक भाषांमधली स्थितीही तेवढीच केविलवाणी आहे.

राज्य अधिनियमांच्या बाबतीतही अशाच प्रकारची प्रक्रिया आहे. फक्त एकाच पातळीवरून काम होत असल्यामुळे ते अधिक सोपे होते, एवढेच. त्यांना अधिकृतता

देण्याचे काम राज्य शासनाचा विधी व न्याय विभाग करतो. तर तात्पर्य हे की सर्व राज्य व निवडक केंद्रीय अधिनियम स्थानिक भाषेत अनुवादित करून जनतेला उपलब्ध करून द्यावेत अशी शासनाची अट आहे. अचूक अनुवादासाठी भाषा संचालनालया-सारख्या मोठमोठ्या आस्थापना तयार करण्यात आल्या आहेत. काटेकोर प्रक्रिया घालून देण्यात आल्या आहेत. मुद्रणासाठी शासकीय मुद्रणालये तर विक्रीसाठी ग्रंथागारे आहेत. आजतागायत १६२ केंद्रीय व २२४ राज्य अधिनियमांचे प्राधिकृत पाठ मराठीतून प्रसिद्ध करण्यात आले आहेत. इतर राज्यांचीही अशीच कहाणी असेल. खरा प्रश्न असा आहे की ह्या सर्व खटाटोपाचा उपयोग काय?

मराठी पाठांचे वाचन वा गरीब-वंचितांसाठी त्याचा उपयोग केला जात नाही. सामान्य जनतेला, अधिनियमांचे आपल्या भाषेत प्राधिकृत पाठ आहेत. याचाही पत्ता नाही. न्यायालयांतील परिस्थिती आणखीच वाईट आहे. न्यायाधीशांपासून तर तेथे दाद मागायला जाणाऱ्या व्यथित-पीडितांपर्यंत कुणालाही, कायदा आपल्या भाषेत वाचून समजून घेता येतो ह्याची माहिती नाही. जाणीव जागृतीच्या कक्षा रुंदावण्याची क्षीण प्रेरणाही कुणाच्या ठायी नाही. पुढे जाऊन लोकशाही अर्थपूर्ण करणे... वगैरे कुणाच्या गावी आहे?

उच्च शिक्षण हे विधी व न्यायव्यवस्थेशी संलग्न असे आणखी एक क्षेत्र. पण महाराष्ट्रातील तमाम विद्यापीठे आणि विधि-महाविद्यालये मराठीतून कायद्याचे शिक्षण देणे नाहक समजतात. ('पेपर मराठीतून लिहिण्याची परवानगी दिली आहे की आम्ही! अध्यापन मात्र नाही जमणार.' असे मला पुण्यातील सर्वोत्कृष्ट विधि-महाविद्यालयाच्या प्राचार्यांनी म्हटले होते!) काय मराठी शब्द, परिभाषा, अधिनियमांची नावे, (ही निश्चित असतात व त्यात बदल करता येत नाही.) विधि-वाक्प्रयोग आणि विधितत्त्व-मीमांसेसारख्या कठीण विषयाच्या मराठीतून नोट्स पुरविणे ही महाविद्यालयाची जबाबदारी नाही? विद्यार्थी मराठी माध्यम का मागतात, तर त्यांना इंग्रजी समजत नाही, मराठीतून व्यक्त होणे त्यांच्यासाठी सोपे आहे म्हणून. हे भान उच्च शिक्षणाधिकाऱ्यांना व प्राध्यापक-प्राचार्यांना कधी येणार? अनेक पदरी अन्यायांचे बळी ठरलेल्या गरीब व विशेषत: ग्रामीण विद्यार्थ्यांना आपल्या भूमीचा कायदा शिकण्याचा व जाणून घेण्याचा अधिकार नाही काय?

अशा रीतीने, भारतीय संविधानाच्या कर्त्यांनी केलेले प्रचंड काम, घालून दिलेल्या सुविधा आणि तरतुदी पूर्णपणे वाया गेल्या आहेत. जनतेपर्यंत पोहोचून त्यांच्या आयुष्यात त्याचा उजेड अद्यापही पडलेला नाही. ह्या सर्व अनागोंदीला कारणीभूत असलेले घटक पुढीलप्रमाणे सांगता येतील.

* राजकीय इच्छाशक्तीचा अभाव

* शासकीय कर्मचाऱ्यांना त्याच्याशी काहीच कर्तव्य नसणे. नोकरशाहीत अंगभूत असलेला उत्तरदायित्वाचा अभाव.
* असे काही साहित्य उपलब्ध असल्याचेच माहिती नसणे.
* जाहिरात न होणे - इतक्या लहान पुस्तकांची जाहिरात कोण करणार?
* सदोष विक्री पद्धत - महाराष्ट्रातील सातआठ ग्रंथागारांमधूनच आणि तीही कार्यालयीन वेळेतच विक्री. विक्रेत्या कर्मचाऱ्यांची अगाध अनास्था. परिणामी तेथून खरेदी करणे महाकठीण.
* अधिनियमांशिवाय नियम, विनियम, आदेश, विनंतीअर्ज आणि निर्णयविधी मराठीतून उपलब्ध नसणे.
* ह्या साऱ्याचा परिणाम म्हणून सामान्य माणूस कायदा जाणून घेण्याच्या फंदातच पडत नाही. मग तो त्यांचे अनुपालन कसे करणार? चांगल्या तरतुदींचा लाभ घेणे, त्यांच्या आधाराने न्याय्य हक्क पदरात पाडून घेणे हे त्याला शक्य होत नाही. अन्याय्य तरतुदींविरुद्ध लढा देणे, हे तर आज कुणालाच शक्य होत नाही. मग तो कुणी मोठा उद्योजक असो, वा रस्त्यावरील भिकारी.
* लोकशाही ही सामान्य माणसाला सक्षम करण्यासाठी अंगीकारलेली राज्यपद्धती आहे. ती कायद्याचे राज्य म्हणून चालविली जाते. कायद्याचे पालन करावे अशी नागरिकांकडून अपेक्षा आहे. कायदा माहीत नव्हता अशी सबब त्यांना सांगता येत नाही. मग स्थानिक भाषेत वा सामान्य माणसाच्या मातृभाषेत कायदा उपलब्ध करून देणे ही शासनाची जबाबदारी नाही का? तसे नव्हते तर आपण राजभाषा अधिनियम का संमत केला? वा प्रमुख भारतीय भाषा संविधानात का अनुसूचित केल्या?
* **जागतिकीकरणाचा परिणाम** - जागतिकीकरणामुळे सामाजिक संरचना, संकल्पना आणि मूल्ये ह्यांच्यामध्ये विलक्षण बदल घडवून आणला आहे. कल्याणकारी राष्ट्र ही संकल्पना लुप्त होऊन त्याऐवजी बाजारी अर्थव्यवस्था आली. नागरिकाची जागा ग्राहकाने घेतली. ह्यामध्ये भारतीय समाजाला ज्या बदलांना तोंड द्यावे लागले, ते बहुश: तळातल्या लोकांना गाळात नेणारे बदल होत. बलशाली व सत्ताधारी लोकांच्या नजरेत तर आता हे लोक अस्तित्वातच नाहीत. त्यामुळे त्यांच्या समस्या सोडविणे ही आता राष्ट्राची वा बाजाराची, कुणाचीच गरज राहिलेली नाही. कायदा तयार करण्याची तथाकथित लोकशाहीवादी प्रक्रियादेखील दुर्मीळ संसाधनांवर मूठभरांची खाजगी मालकी, त्याचा अनिर्बंध उपभोग घेण्याचा हक्क ह्यासाठीच वापरली जात आहे. सामान्यांना कायद्याच्या ज्ञानापासून दूर ठेवण्यातच त्यांना स्वारस्य आहे. सामायिक मालकीच्या संसाधनांचे खाजगीकरण करणाऱ्या राष्ट्राकडून, सामान्यांना त्यांच्या भल्याचे कायदे अवगत करून देण्याची अपेक्षा कशी करता येईल?

उद्योग व व्यापार ह्यात आज इंग्रजीला सर्वात महत्त्वाचे स्थान आहे. त्यामुळे 'फाडफाड इंग्लिश बोलता येणे' म्हणजेच आजच्या युगात चटपटीतपणा, उच्च राहणीमान आणि सत्ता. स्थानिक भाषा दिवसेंदिवस संदर्भहीन होत चालल्या आहेत. वैश्विक खेडे वगैरे शब्दांवरून तर इंग्रजीच आजच्या जगाची एकमेव भाषा असल्याची अजब जाणीव तरुण पिढीस होत आहे. गंमत अशी की ह्या जाणिवेमुळे त्यांची इंग्रजी सुधारली नाही, की त्यांच्या संकुचित आयुष्याला जागतिकीकरणाच्या व्यापकतेचा पदर जोडला गेला नाही. उलट त्यामुळे संस्कृतीहीनता, भाषाहीनता याकडे त्यांची वाटचाल सुरू आहे. आजच्या तरुणांना कुठलीच भाषा नीट येत नाही. इंग्रजीचे आकर्षण आहे, पण ती येत नाही. मातृभाषेबद्दल मनात आदरच उरलेला नाही. त्यामुळे, सत्ताधारी तसेच ऊर्जितावस्थेकडे जाणारे सर्वसामान्य ह्या सर्वांनाच आज स्थानिक भाषा नको आहे.

**संभाव्य उपाय**

* अनुवादित अधिनियम, त्यांची यथायोग्य जाहिरात करून खाजगी दुकानांमध्ये उपलब्ध करून द्यावेत.
* न्यायव्यवस्थेला विश्वासात घेऊन किमान दुय्यम न्यायालयांमध्ये तरी स्थानिक भाषेतून कामकाज सक्तीचे करावे. आतापर्यंत केलेले याबाबतीतील प्रयत्न व्यर्थ गेले आहेत.
* विधिमहाविद्यालयांमध्ये स्थानिक भाषेचे माध्यम सक्तीचे करावे. त्यासाठी आवश्यक असलेली अचूक व अधिकृत परिभाषा उपलब्ध आहे.

**अनुवाद हे साध्य नव्हे** - ह्या सर्वांमध्ये, अनुवादाच्या क्षेत्रातील एक महत्त्वाचा मुद्दा मात्र असा आहे की ज्ञान-पाठाचा अनुवाद करणे हे आव्हान आहे - मग तो कायद्याचा असो, विज्ञानाचा वा तंत्रज्ञानाचा. आपला उद्देश हा अर्थपूर्ण व नेमके प्रतिरूप दुसऱ्या भाषेत साकार करणे हा आहे. त्यासाठी आपल्याला अनेकदा क्लिष्ट व बोजड शब्दांचा आधार घ्यावा लागतो. हे आवश्यक असले तरी पुरेसे नाही. अचूक अनुवाद तांत्रिक दृष्ट्या आवश्यक असला, तरी लोकांपर्यंत पोहोचविण्यासाठी त्यातील आशय सोपा करून सांगणेही तेवढेच गरजेचे आहे. भूमिसंपादन अधिनियम ह्या आपल्या देशाच्या एका मूलभूत अधिनियमावर, कायद्याचा पाठ सोप्यात सोपा करून दाखवणारे एक पुस्तक मी लिहिले आहे. अल्पशिक्षित, नवसाक्षर व्यक्तीला कोणताही कायदा नुसता वाचून समजून घेता यावा इतपत त्याची तयारी करून देण्यासाठी, पंचवीस पानी कायद्यावर ४०० पृष्ठांचे पुस्तक लिहिणे हा माझा एक अविस्मरणीय अनुभव राहिला आहे.

कायद्यापुरते बोलायचे झाले तर आपल्याला इंग्रजीतून आणि ब्रिटिश कायद्याच्या पद्धतीने विचार करण्याची सवय लागली आहे. परंतु स्वतंत्र भारताच्या न्यायव्यवस्थेने कायम अनुवादित अधिनियमांवरच समाधान मानावे काय? अनुवाद हेच सर्वांवरचे उत्तर नाही. त्या प्रक्रियेत अनेक बारकावे क्षीण वा लुप्त होऊ शकतात. कधीतरी, कुठेतरी





अनुक्रमणिका

आपल्या समस्यांचे उत्तर आपल्याला आपल्या भाषेत शोधावेच लागेल. कायम परभाषेत विचार करणे हे आपल्या मूलगामी विचारप्रक्रियेच्या आड येणारे आहे.

स्थानिकीकरण व जागतिकीकरण ह्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. दुर्दैवाने अनेकांना असे वाटते की जागतिकीकरणाचा जोर इतका आहे की ते एक ना एक दिवस स्थानिकीकरणाला खाऊन टाकील! अनेकांनी स्थानिक असे काहीही टिकवून ठेवण्याची आशाच सोडून दिली असून त्या प्रक्रियेत ते स्वतःही उपटले जात आहेत. अनुवादविषयक कार्यशाळा ही ह्या प्रक्रियेवर उपाय सांगण्यासाठी योग्य जागा आहे, ह्या दोन गोष्टींमधली परस्परता टिकवून ठेवू या.

■

**चौथीतल्या अभिजितची कविता**

**देवांची क्रिकेट**

स्वर्गाच्या अंगणात देवांनी सुरू केली क्रिकेट
शून्यावर घेतली इंद्राची विकेट

ब्रह्मदेवाने बॉलिंग केली अशी ताठ
गणपतीला मिळाल्या धावा आठ

शंकर भोळा झाला रनआऊट
पंढरीचा विठोबा अठ्ठावीस रनावर गेला

हनुमंताने ठोकले शतकावर शतक
रामाला भेटला मस्त भागीदार

श्रीकृष्णाला बॅटही बासरी वाटली
बघता बघता दांडी उडाली

विष्णूने मात्र शतक लावले
नारदाने कॉमेंट्री संस्कृतात केली

वरुणाला ठेवले राखीव जागी
पाऊस पडला झाली भागाभागी

- रमेश पानशे, 'निळे आकाश, हिरवी झाडे, काळी माती', पृ० ५८

# भाषेचे आद्यरूप : अर्थपूर्ण शब्दरूप

रमेश पानसे

भाषा ही अर्थसिद्धीसाठीच असते. भाषा, मग ती संवादक्षेत्रातील असो व ती विचारक्षेत्रातील असो; ती बोलण्यातील असो वा ती लिहिण्या-वाचण्यातील असो तिच्या अस्तित्वाचे समर्थन तिच्यातून काहीतरी अर्थ व्यक्त होतो या घटनेमुळेच होते. 'निरर्थक' बोलणाऱ्यांचे स्वागत होत नसते; कारण ते बोलणे कोणासही, कोणत्याही स्तरावर उपयुक्त नसते.

भाषानिर्मितीत समाविष्ट असलेल्या (१) अक्षर, (२) शब्द, आणि (३) वाक्य या तीन घटकांचा विचार केला तर असे लक्षात येईल की यांपैकी दुसऱ्या (म्हणजे शब्द) आणि तिसऱ्या (म्हणजे वाक्य) याच घटकांना काय तो अर्थ असतो. असू शकतो. अक्षरांना स्वत:चा असा काही अर्थ नसतो. अक्षरांना दोनच परिमाणे असतात. एक त्याला उच्चारता येणारा असा एखादा निश्चित स्वरूपाचा ध्वनी असतो. आणि लिखित स्वरूपात त्याला स्वत:ची अशी एक रचना (Design) असते. किंबहुना या विशिष्ट पद्धतीने लिहिलेल्या रचनेवर काही एक सर्वमान्य असा ध्वनी लादलेला असतो. या दोहोंमुळे अक्षराला 'अक्षरत्व' येते. पण त्याला स्वत:चा काही अर्थ नसतो, किंवा तिसरे अर्थाचे परिमाण नसते, ही त्यातील उणीव असते.

भाषेतील अर्थपूर्ण असा, सर्वात लहान पण एकसंध घटक म्हणजे शब्द होय. शब्दाला तीनही भाषिक परिमाणे असतात. त्याला अक्षरांच्या रचनांची बेरीज असलेली एक रचना असते; तिला अक्षरांनी प्राप्त करून दिलेला उच्चार असतो आणि, त्याला स्वत:चा म्हणून काही खास अर्थ प्राप्त झालेला असतो.

एक किंवा अनेक शब्दांच्या समूहाने, आणि भाषेच्या वैयक्तिक व्याकरणाने सिद्ध केलेली अशी एक मांडणी असते. कदाचित शब्द व्यक्त करीत असलेला अर्थ अपूर्ण ठरतो. मग त्याला इतर शब्दांच्या जोडणीने अर्थाची परिपूर्णता प्राप्त केली जाते. याचा अर्थ असा की एखादा शब्द, इतर शब्दांच्या साहाय्याने वाक्यनिर्मिती करून शब्दाच्या अर्थाचा विस्तार तरी करतो किंवा इतर शब्दांच्या साहाय्याने शब्द संबंधित असा पूर्णार्थ तरी व्यक्त करतो. वाक्य हे अर्थनिर्मितीचे प्रगल्भ रूप आहे.

अर्थनिर्मितीच्या बाबतीत बोली भाषा ही लिखित प्रमाण भाषेपेक्षा अधिक शक्तिमान ठरते. कारण कित्येकदा ती मोजक्या शब्दांत, पुरेशी व्याकरणशुद्ध मांडणी न करताही पुरेसा अर्थ व्यक्त करते. तिचे लिखित रूप कदाचित अधिक विस्ताराचे व अधिक

व्याकरणशुद्ध असते. त्यामुळे निदान शब्दसंख्येच्या अर्थाने बोली भाषेतील वाक्ये अधिक काटकसरीची पण संकेतनिबद्ध अशी असतात.

भाषाशिक्षणाचा व्यवहार जेव्हा पुढे उभा ठाकतो तेव्हा, असे अनुभवाला येते की, मुलांना अक्षर ओळख करून देणे हे मोठे जिकिरीचे काम असते. औपचारिक शालेय शिक्षणात सामान्यत: पहिले वर्ष हे त्यासाठी मुक्रर केलेले असते. शिक्षणाचा 'श्रीगणेशा' करणे हा वाक्प्रचार पडला आहे तोही ही अक्षरे गिरविण्याची सुरुवात करण्याचा पायंडा पडल्यामुळे. आधी पूर्ण बाराखडी आणि मग क-कापासून कं-क:पर्यंत ते थेट 'ज्ञ'च्या पंक्तीपर्यंत मुले घोकतात, लिहितात. पुन्हा पुन्हा घोकून लिहितात. या सर्व प्रयत्नांत त्यांची चांगलीच दमछाक होते. एवढे सारे, सरावांचे अनेक सोपस्कार करूनही, अनेक मुले वर्ष संपून गेले तरीही लिहिती-वाचती होत नाहीत. हा अनुभव विदारक आहे; कारण तो सार्वत्रिक आहे.

वास्तविक आधी अक्षर मग बाराखडी; त्यानंतर मग शब्द आणि नंतर वाक्ये, ही शिकण्याची क्रमवारी भाषेचे स्वरूप नीटपणे लक्षात न घेतल्याने परंपरेत स्वीकारली गेली आहे, असे मला वाटते.

भाषेचा मूळ घटक हा 'अक्षर' नसून 'शब्द' आहे हे सत्य आपण स्वीकारले पाहिजे. उत्क्रांतीच्या विशिष्ट अवस्थेत माणूस बोलायला लागला ते शब्दच. बोलीभाषेच्या विकासाची सुरुवात ही शब्दाने झाली असणार कारण, तीच भाषानिर्मितीची प्रेरणा होती. माणसाची, गट करून राहिल्यानंतर परस्पर संपर्काचे संवाद हे साधन म्हणून वापरण्याची गरज होती. आणि असा संवाद हा 'अर्थ'पूर्णच असायला हवा. त्यामुळे मानवी गरजेतून निर्माण होत गेलेल्या भाषेत शब्द हा अर्थ घेऊनच जन्माला आला; अर्थ व्यक्त करण्यासाठीच माणसाने तो वापरला. थोडक्यात असे की, अर्थ व्यक्त करण्यासाठीच शब्दाचे अस्तित्व आहे.

शब्दांचे वाक्यांमध्ये शिरणे ही प्राचीन माणसाची बोलीभाषेची प्रगत अवस्था आहे. शब्दसमूहाने अर्थाचे नेमकेपण ठरते. विस्तारीकरण होते. या गुणांची संवादात अनिवार्य गरज असते असे केव्हातरी माणसाच्या लक्षात आले असावे; आणि त्यातून भाषा ही वाक्यरूप झाली असावी.

शब्दांचे अवयव असलेल्या अक्षरांची शास्त्रशुद्ध मांडणी, भाषा संस्कारित करून केलेली व्याकरणव्यवस्था या खूप उपयुक्त; पण उत्क्रांतीच्या कालौघात खूप नंतरच्या गोष्टी आहेत; विशेषत: भाषा लेखनरूपात अवतरल्यानंतरची ती प्रगती आहे.

भाषा प्रगतीची ही सारी मालिका लक्षात घेतली तर भाषाशिक्षणाची सुरुवात अर्थपूर्ण शब्दाने व्हावी हे उचितच ठरते. कारण माणसाला भाषेच्या विविध उपयोगांसाठी शब्दांचीच गरज असते (सुट्या अक्षरांची अर्थातच नाही!) लहान मुले शालेय स्तरावर लिहा-

वाचायला शिकू लागतात. त्यापूर्वी ऐकण्या-बोलण्याने त्यांना भाषेची ओळख चांगली झालेली असते. ही ओळखही अर्थपूर्ण शब्दांचीच झालेली असते; कारण, त्यांचा त्याच कारणाने त्यांनी वापर केलेला असतो. ऐकलेला, बोललेला, अर्थाची ओळख असलेला असा शब्द हा समोर ठेवून लिहिण्या-वाचण्याची सुरुवात केल्यास ती सहजतेने होते. मुले कमी कष्टात आणि लवकर लिहिती-वाचती होतात.

भाषेच्या औपचारिक शिक्षणाची सुरुवात अर्थात्मक शब्दांनी करावी याला अलीकडच्या मेंदूशास्त्रानेही संशोधनसार पुरविले आहे. ज्ञानग्रहण करताना मुले, अर्थाचा शोध घेत असतात; किंबहुना अर्थात्मकतेचा शोध घेत जाणे हीच त्यांची निसर्गदत्त शिक्षणप्रक्रिया असते. त्यामुळे जे जे अर्थपूर्ण ते ते त्यांच्या आकलनात सहजपणे अवतरते आणि जे जे अर्थविहीन ते ते नाकारण्याचीच मेंदूची प्रवृत्ती असते. एवढेच नव्हे तर, अर्थविहीन वाटणाऱ्या गोष्टी केवळ कोरडेपणाने पाठ करण्याकडे मुलांची वृत्ती होते. अशा घोकंपट्टीतून केवळ मनावर ताणच निर्माण होतात असे नाही तर त्याने 'घसरणी'ची स्थिती अस्तित्वात येते. मेंदूविषयक शास्त्रात घसरणीची स्थिती याचा अर्थ रक्तप्रवाह बौद्धिक मेंदूकडून खाली भावनिक मेंदूकडे घसरतो. याने बौद्धिक कामात अडथळा निर्माण होतो; आणि मुले अधिक करून आपल्या भावनांच्या आहारी जातात. प्रत्यक्ष लहान मुलांच्या शिक्षणात काम करीत असणाऱ्यांना याचा प्रत्यय येतो.

आपण जेव्हा वाचन करीत असतो तेव्हाही आपण डोळ्यांनी, अक्षरे नव्हे तर शब्दरूपच ग्रहण करीत जातो. आणि हे शब्दरूप अर्थपूर्ण शब्दरूप असते तेव्हा अर्थातच त्याचा मनापर्यंत पोहोचण्याचा मार्ग सहज सुकर असतो. कारण, मेंदू शब्दप्रतिमा साठवून ठेवत असतो. आणि नवी वाचत असलेली शब्दरूप प्रतिमा आणि मेंदूतील त्या शब्दरूपाची साठून राहिलेली प्रतिमा यांची विनासायास सांगड घातली जात असते. हे कार्य इतके झकास होत असते की आपण वाचताना शब्दोच्चार टाळून थेट दृष्टीवाटेच शब्दग्रहण करीत जातो; शब्दग्रहणाच्या पाठीवर बसून अर्थग्रहण झालेलेच असते.

■

# क्षीरोदकावरचे शब्दरत्नबुट्टे

**शरदिनी मोहिते**

ज्ञानेश्वर काळात 'मराठा बोलु' कौतुक पावला. पंडितांनी विद्वानांनी सर्रास वापरलेल्या देववाणीचे-संस्कृत भाषेचे अत्युच्च आणि अपूर्व स्थान वादातीत असले, तरी ती दिव्या गीर्वाण भारती' जनसामान्यांच्या आवाक्यापलीकडची भाषा होती. ज्ञानाने, विज्ञानाने हाताळलेले विषय व पादाक्रांत केलेले निरनिराळे प्रांत जनसामान्यांनाही समजावेत, अनुभवता यावेत अशी तळमळ संत महात्म्यांना वाटली; यात त्यांची सहृदयता तर दिसतेच, शिवाय दिव्य अशी दूरदृष्टीही दिसते.

मुळात गुजराथेत जन्मलेला एक ब्राह्मण प्रधानपुत्र-हरपाळदेव-आपल्या पुनरुज्जीवना-नंतर महाराष्ट्रात आला, आणि महाराष्ट्राचाच झाला. 'चक्रधर झाला', 'मराठीचा अभिमानी झाला', 'महाराष्ट्री असावे' असे नेहमी म्हणत राहिला, मराठीसाठी त्याने खूप आणि खरा आग्रह धरला, ही गोष्ट नवलाचीच म्हणावी लागेल. मराठी भाषा, सर्व-सामान्यांची भाषा. तिचा अभिमान धरावा. आपल्याला जे काही म्हणायचे असेल, ते आपल्या भाषेतच म्हणावे असा स्पष्ट दंडक चक्रधरांनी आपल्या शिष्यांना घातला, आणि तो स्वत:ही अमलात आणला...

त्या काळी तुमचे आमचे पूर्वज कोणत्या भाषेत कसे बोलत होते याचे दर्शन महानुभावी ग्रंथांतून (विशेषतः गद्यग्रंथातून) होते. त्या भाषेचा सहजसुंदर गोडवा आपल्याला लळा लावतो तो उगीच नाही; कारण, तिच्या द्वारे आपण जणू आपल्या पूर्वजांनाच भेटतो!

...परवा असंच झालं. पंधराव्या शतकातला महानुभाव पंडित कवी एल्हण, याचे - श्रीकृष्ण षोडष सहस्र विवाह अष्टस्वयंवर वर्णन या नावाचे काव्य वाचण्यात आले. स्वत: कवी या काव्याचं वर्णन 'आठैसैंवरे' असंच करतो - म्हणतो ''एवं आठैसैंवरे संपूर्ण समाप्ता:''

मला मिळालेली या काव्याची प्रत १९६७ साली महाराष्ट्र साहित्य परिषद आंध्रप्रदेश, हैदराबादचे कार्यवाह डॉ० ब०दा० आगाशे यांनी प्रकाशित केलेली आहे. प्रा० रघुनाथ महारुद्र, भुसारी या सिकंदराबाद कॉलेजच्या माजी प्राचार्यांनी हे काव्य संपादित केले आहे. प्रकाशनकाळ फार पूर्वीचा नसला तरी प्रतीची अवस्था (कागदाची) चांगली नाही. तरी अत्यंत उत्सुकतेने मी हे पुस्तक वाचायला घेतले. एल्हणा कवीचं नाव ऐकलेलं. विषयही श्रीकृष्णाच्या विशेष विवाहांचा. ८ स्वयंवरांचा - रुक्मिणी,

जांबुवंती, सत्यभामा, कालिंदी, सुमित्रविंदा, नाग्नजिती (सत्या), लक्ष्मणा आणि भद्रा या आठ जणींनी स्वयंवराद्वारे श्रीकृष्णाच्या जीवनात केलेले प्रवेश, व त्या त्या वेळची परिस्थिती, घडलेले प्रसंग यांची वर्णने पुस्तकात आहेत. या पुस्तकातल्या मला वेगळ्याच वाटलेल्या काही शब्दांची मी नोंद केली... कंसात ओवी क्र० दिले आहेत.

| | | |
|---|---|---|
| अगड | - खंदक | (७२७) |
| अनोज | - उपवास, (आपण अनुशापोटी म्हणतो) | (२५०) |
| अमृतफळ | - मोदक | (८९) |
| आंगसीके | - प्रसादवस्त्र | (६) |
| आफाविले | - बोलावले | (६२२) |
| उधातिया | - तारुण्याचा भर | (६१८) |
| कराडी | - पर्वताची किंवा नदीची दरड, कडा | (२२६) |
| कलंग टोपरा | - घोड्याची कलगी | (९१) |
| कवीकुळपैकु | - कविकुलाचा समुदाय | (११) |
| कालनी बुवे | - पातळ पदार्थ ताक, कढी इ० | (४०३) |
| केजेनी | - भाजीपाला घेऊन धान्यरूपाने चुकती केलेली किंमत (बार्टर, भारी किमतीचा पदार्थ हलक्या किमतीस विकणे) | (७०७) |
| गीरीरी | - चक्कर, मूर्च्छा | (२३७) |
| चौबारी | - चारबाजूंनी पाणी काढण्याची व्यवस्था असलेली विहीर | (३७१) |
| जाळाधरा | - जाळी, खिडकी | (६२९) |
| ज्वाळीकार | - मशाली घेऊन जाणारे जासूद | (४२ |
| झोतिवा | - पाण्याचा मोठा प्रवाह, लोंढा | (५१) |
| टेंभीएणी | - टेकडी | (१४६) |
| ठीकलगे | - रत्नजडित अलंकार | (३८०) |
| डांगी | - बाभळीचे वन | (४४) |
| डोल्हारा | - पाळणा, झोपाळा | (१६९) |
| तृंबोली | - फुलांची रचना केली, गुंफली | (६६२) |
| दोघे दोघे | - चार वेद | (८३) |
| धवांची | - बीळ, भगदाड | (१३७) |

| | | |
|---|---|---|
| धुंवारी | - धुरामुळे व्याकूळ | (५८९) |
| नवनवजणे | - १८ पुराणे | (२८४) |
| पाखरा | - हत्ती, घोडा इत्यादींना युद्धात शरीरसंरक्षणासाठी घालतात ते लोखंडी चिलखत | (८८) |
| पाएवटा | - पायातील एक दागिना | (३८२ |
| पुराणसरचंद्र | - पुराणरूपी शरचंद्र | (३) |
| फुलपगार | - डोक्यात घालायचा फुलाच्या आकाराचा दागिना | (३७८) |
| बंबाळ | - तेजोमय, दीप्तिमान | (५७) |
| भैरव गुंडे | - मोठे दगड | (२३५) |
| मळएपांचौरे | - पाच सुगंधाचे वस्त्र, अथवा मिश्रण, कापूर, कस्तुरी, जपा केशर आणि चंदन ही पाच सुगंधी द्रव्ये | (१२५) |
| मागध | - वंशावळी गाणारे भाट | (३७४) |
| मुक्ताफळी | - नथ | (३८१ |
| मेघडंबरा | - आभाळ भरून येणे | (६०२) |
| यूषीती | - स्त्रिया | (३७६) |
| राधा यंत्र कळा | - पणाच्या (स्वयंवरासाठी लावायचा पण) एका प्रकारच्या यंत्राची मांडणी | (६४२) |
| लाही | - भडिमार | (६२९) |
| वोहरी | - शून्य | (१७९) |
| सराग | - तांबडा | (४७०) |
| स्यानीसळा | - निळा रंग | (६८६) |
| हरळु | - खडा | (१५६) |
| क्षीरोदक | - उंची रेशमी वस्त्र, शालू, पांढरे वस्त्र | (३९५) |

आता, या शेवटच्या विलक्षण सुंदर शब्दाशी येऊन पोचल्यावर मी थोडी थबकले. वाटलं, शब्दांची एक मांदूस - एक जणू खजिनाच - आपण उघडला काय, आणि किती विलक्षण अनुभव घेतला! वाटलं न कळता घडलेल्या अनोजाचं पारणं थोडं फार फिटलंया. विलक्षण वातावरणात वावरून... सर्वत्र दिव्य, मंद स्यानीसळाची पखरण

असलेल्या छानशा भव्य दालनात दैवी क्षीरोदक पेहरून महाराष्ट्र शारदा डोल्हाऱ्यावर बसून झुलते आहे. तिच्या पुढ्यात कविकुळपैकु ठाकला आहे. दोघे दोघे, नवनवजणे चर्चेत आहेत. पुराणसरचंद्रही मधूनच डोकावतो आहे. शारदेच्या ओढीनं तिला भेटायला कामिनी कल्प निघालेला आहे... ठीकलगे छानच झळकताहेत, मळपाचौरे घमघमतायत... टेंभएणी मागे पडली, चौबारीही ओलांडली, मेघडंबरानं थोडी चुणूक दाखवली, तरी या लेकी आल्या दालनाच्या दाराशी आल्या तेव्हा त्यांच्या पाएवटांचा आल्हादक नाद झाला. सारे हरखले. आम्हीही हरखलो. आनंदाला कवेत घेऊ पाहिले तर कवेची मिठी होण्याची गंमत झाली. झेपच पडली... एकेक शब्द आगळयावेगळ्या तोलाचा, झोकाचा. अमृतफळांची आस लागली होती ती या शब्दरत्नांच्या बंबाळानी पुरी केली... महाराष्ट्र शारदा प्रसन्न हसली. आनंदानं तिची काया मोहरली, आणि तेव्हा तिच्या क्षीरोदकावरचे शब्दरत्नांचे बुट्टे छान, नाजूकपणे लकाकले... आगळ्याच सुखानं आम्ही सारेच जण धन्य झालो!

■

## परिषद वार्ता

### ● महाबँक लेखनविषयक पुरस्कार २०१२

मराठी अभ्यास परिषद आणि बँक ऑफ महाराष्ट्र यांच्या संयुक्त विद्यमाने देण्यात येणारा २०१२चा महाबँक लेखनविषयक पुरस्कार 'बोली, समाज, साहित्य आणि संस्कृती', डॉ० कैलास सार्वेकर, प्रतिभास प्रकाशन, परभणी, २०१० या पुस्तकास दि० २० जानेवारी २०१३ला डॉ० ब्रह्मानंद देशपांडे यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आला. डॉ० माधवी कोल्हटकर, डॉ० कल्पना कुलकर्णी व विजया चौधरी (निमंत्रक) यांचा निवड समितीत समावेश होता.

### ● चर्चासत्राचे आयोजन

मराठी अभ्यास परिषदेतर्फे 'शालेय शिक्षण : सेमी-इंग्लिश पद्धतीनुसार असावे काय?' या विषयावर दि० १६ डिसेंबर २०१२ला चर्चासत्राचे आयोजन करण्यात आले. शिक्षणतज्ज्ञांच्या उपस्थितीत रंगलेल्या या चर्चासत्राचा विस्तृत अहवाल पुढील अंकात उपलब्ध होईल.

# दोन वैशिष्ट्यपूर्ण शिलालेख

**नवनाथ अंगद शिंदे**

उस्मानाबाद जिल्ह्यातील भूम-परांडा तालुक्यात माणकेश्वर हे गाव समाविष्ट होते. 'भूम महाल'[१] प्रामुख्याने पूर्वी भूम-परांडा एकच मतदार संघ असल्याकारणाने ओळखला जायचा. आता भूम स्वतंत्र तालुका आहे. 'महाल'[२] याचा शब्दकोशातील एक अर्थ मंदिर असा आहे. प्रामुख्याने येथील प्रसिद्ध जैन तीर्थक्षेत्र, मराठवाड्यातील सर्वात प्राचीन असणाऱ्या माणकेश्वर येथील शिव-सटवाई मंदिरामुळे या तालुक्यास महाल शब्दप्रयोग केला जात असावा. 'माणकेश्वर हे गाव निजाम राजवटीचे शेवटचे टोक. माणकेश्वर येथील शिव-सटवाई मंदिर गावाच्या पूर्वेस गावापासून अंदाजे दीड किमी अंतरावर विश्वरूपा नदीकाठावर आहे.'[३] माणकेश्वर परिसर ग्रामदैवतांनी गजबजलेला दिसून येतो. येथील शिव-सटवाई ही दोन्ही मंदिरे जागृत देवस्थान म्हणून पंचक्रोशीत ख्यातिप्राप्त लोकदैवते आहेत. जिथे अशी प्राचीन लोकदैवते असतात, त्या परिसरात त्याबद्दल अनेक तर्क-वितर्क, मौखिक स्वरूपात माहिती असते. ठोस अशी सत्य माहिती लोकसमाजात आढळत नाही. संशोधन करताना याचा अनुभव मला पावलोपावली आला.

## (१) 'शिव' मंदिर

दुर्लक्षित पण अत्युत्कृष्ट कोरीव आणि शिल्पकलेचा उत्कृष्ट नमुना असलेले हेमाडपंती शिव मंदिर हे यादवकाळातील मराठवाड्यातील सर्वात प्राचीन मंदिर आहे. 'हेडक्वार्टर ऑफ द रिजन, राइट इन द व्हिलेज इज अ ब्युटिफुल ॲण्टीक्वारियन रिमेन इन द फॉर्म ऑफ अ चालुक्यन आर्किटेक्चर'[४] वास्तुशिल्पाचा उत्कृष्ट नमुना असलेले शिवमंदिर गावाच्या पूर्वेस असून उगवत्या सूर्याची पहिली किरणे शिवलिंगाच्या गाभाऱ्यात पडून संपूर्ण शिवालय प्रकाशमय बनते.

## (२) 'सटवाई' मंदिर

सिंधुसंस्कृतीपासून भारतीय समाजात मातृदेवतेची पूजा प्रचलित आहे. माणकेश्वरला शिव मंदिराच्या डाव्या बाजूला सटवाईचे मंदिर आहे. घडीव दगडांनी बांधलेल्या मंदिरासमोर होमकुंड आहे. मंदिर पूर्वाभिमुख असून त्यामध्ये गर्भगृह व समोरचा सभामंडप अलीकडच्या काळात बांधलेला आहे. गर्भगृहाचे प्रवेशद्वार लहान आहे. वास्तूची जमिनीपासून उंची पाच फूट आहे. सटवाई मंदिराचे रंगकाम केलेले असून प्रवेशद्वारावर

चंद्र व डाव्या बाजूला सूर्याचे देवतारूपातील चित्र रेखाटले आहे. मूळ सटवाई मूर्ती अलंकारयुक्त कोरलेली असून चतुर्भुज आहे. माणकेश्वर परिसरामध्ये सटवाई हे देवस्थान खूपच प्रसिद्ध असून नवसाला पावणारी 'आई' म्हणून ती ओळखली जाते.

### (३) यादवकालीन दोन कोरीव शिलालेख

मराठवाडा ही जशी संतांची, शिल्पकलेची भूमी, तशीच ती शिलालेखांची व ताम्रपटांचीही भूमी आहे. या भूमीने जशा राजवटी पाहिल्या, तशाच विविध संस्कृतीही पाहिल्या. मराठवाड्यात आजवर उपलब्ध झालेल्या शिलालेखाचे समग्र संकलन आणि संपादन डॉ० यू०म० पठाण[५] यांनी केले आहे. या दोनही मंदिरांवरील कोरीव शिलालेखांचा येथे प्रथमच एकत्रितरीत्या नव्याने समग्र विश्लेषण करण्याचा, तसेच निखळलेले दुवे सांधण्याचा प्रयत्न केला आहे.

### (अ) 'शिव' मंदिरातील स्तंभ-लेख

**संहिता**

( १ ) स्वति स्रि सकु ११४५ सुभानु
( २ ) संवछरे माघ सुध १०
( ३ ) लकमलकलीका वी
( ४ ) कासभास्कर (०)? स्रिसिंघ
( ५ ) णदेव स्रीमाणकेस्वरी दत्त
( ६ ) अक्षरं (रां?) किता

**वाचन**

स्वस्ति स्रि सकु ११४५, सुभानु संवछरे, माघ सुध १०, रवि, स्वस्ति स्री यादवकुलकमलकलीकावीकासभास्कर स्रिसिंघणदेव स्रीमाणकेस्वरी दत्त अक्षरं (रां) किता.

**विवरण**

माणकेश्वर येथील शिवमंदिरात हा महत्त्वाचा ऐतिहासिक शिलालेख आज अस्पष्ट स्वरूपात उपलब्ध आहे. त्याचा आकार ५५ सेंमी X २५ सेंमी असा आहे. सदरचा शिलालेख देवीच्या पायाजवळील पायरीवर खोदलेला नसून शिव मंदिराच्या खांबावर (स्तंभ-लेख) कोरलेला आहे. आज तो चुना, पेढा, तेल लावण्यामुळे गुळगुळीत व अस्पष्ट होताना दिसत आहे. यादवकालीन लोकभाषेचे मनोहर, देखणे रूप येथील शिलालेखात प्रकटले आहे. शिलालेखाच्या भाषेतील प्रत्ययप्रक्रियेचा चेहरामोहरा व यादवकालीन साहित्याच्या भाषेच्या प्रत्ययप्रक्रियेचा चेहरामोहरा यांत विलक्षण साम्य आढळते.





अनुक्रमणिका

'र'चे यादवकालीन वळण हे यातील विशेष लक्षणीय बाब होय ('संवछरे', 'रवि' हे शब्द व त्यातील 'र'चे लेखन पाहावे) या शिलालेखात सिंघणदेव यादवांचा स्पष्ट उल्लेख आहे, हेही याचे आणखी एक वैशिष्ट्य होय. त्याचे बिरूद 'स्री यादवकुलकमलकालीकावीकास भास्कर' असे आहे. माणकेश्वर देवतेच्या दानप्रीत्यर्थ हा लेख कोरला आहे, हेही स्पष्ट आहे.

### भाषिक विशेष

भाषिक दृष्ट्या हा लेख विशेष महत्त्वपूर्ण असून हा शिलालेख संस्कृत-मराठी असा संमिश्र असल्यामुळे त्यात तत्सम व तद्भव अशी दोन्ही प्रकारची शब्दरूपे आढळतात.

### शब्दसंग्रह

(१) तत्सम शब्द : स्वस्ति, यादव, कुल, कमल, भास्कर, देव, दत्त, माघ, रवि इ०

(२) तद्भव शब्द : कलीका, वीकास, स्त्री, माणकेस्वर, संवछर, सुध इ०

### वर्णप्रक्रिया

| | | |
|---|---|---|
| ऱ्हस्वीकरण | : | श्री > स्री |
| दीर्घीकरण | : | विकास > वीकास, कलिका > कलीका |
| त्-लीप | : | संवत्सर > संवछर |
| श् > स् | : | शक > सकु |

### प्रत्ययप्रक्रिया

**( १ ) विभक्ती** : प्रथमा विभक्तीचा 'उ' प्रत्यय हे 'यादवकालीन मराठीचे एक लक्षणीय वैशिष्ट्य होय.' ते या लेखातील 'सकु', 'सुभानु' इ० शब्दांत दिसते.

**( २ ) सप्तमी** : ई-प्रत्यय माणकेश्वरी तत्कालीन राज्यकर्ता सिंघणदेव यादव यांच्या नावाचा स्पष्ट उल्लेख शिलालेखात असून 'सकु ११४५' म्हणजे इ०स० १२२३ असा कालोल्लेखही शिलालेखाच्या प्रारंभी आला आहे. 'ट्वेल्थ सेंच्युरी अ‍ॅज द प्रॉबेबल पिरियड ऑफ द कन्स्ट्रक्शन ऑफ धिस टेम्पल'[६] शिलालेखाच्या अभ्यासानुसार माणकेश्वराचे शिव मंदिर हे उत्तरचालुक्य काळातील म्हणजेच यादव काळातील हेमाडपंती असून त्याचा काळ शके ११४५ हाच निश्चित होतो.

### (ब) श्री सटवाई मंदिरासमोरील शिळेवर कोरलेला लेख

श्री सटवाईदेवी मंदिरासमोर भग्न अवशेषातच एक तुलईवजा शिळा पडली असून, त्यावर हा शिलालेख कोरलेला आहे. शेंदूर व तेलांचे ओघळ वाहून लेख दुर्वाच्य झाला आहे. या कृत्यांमुळे लेखाचा डावीकडील भाग पूर्णपणे नष्ट झाला आहे. 'सम्राट सिंघणदेव ह्याचा माणकेश्वर लेख' या शीर्षकाद्वारे वरील लेख डॉ० ब्रह्मानंद देशपांडे यांनी फेब्रुवारी १९७४च्या 'प्रतिष्ठान' मुखपत्रात प्रसिद्ध केला आहे. या लेखाची लिपी यादवकालीन नागरी व भाषा मराठी आहे. शिलालेखाचा प्रारंभ सम्राट सिंघणदेव द्वितीय ह्याचे बिरुदावलीने होतो. कुठले तरी दान अक्षरांकित करण्यासाठी लेख खोदविण्याचे प्रयोजन दिसते. सदर शिलालेखाचे छायाचित्र काढले असता बराचसा भाग अनाकलनीय झाला आहे. आज भाविक या शिळेची श्रीफळ वाढवून पूजा करताना दिसतात.

## समारोप

मराठवाड्यातील यादवकालीन शिलालेखांत दानलेखांची संख्या अधिक आहे. त्याचे कारणही स्पष्टच आहे, की धर्मश्रद्धा हा या काळाचा स्थायीभाव आहे. त्यामुळे विविध धार्मिक कारणांनी दाने दिली गेली आहेत. त्याचे मूर्तिमंत वास्तव उदाहरण माणकेश्वर येथे पाहावयास मिळते. या शिलालेखाच्या आधारे मंदिराचा कालखंड, तत्कालीन लोकजीवन, सांस्कृतिक जाणीव, लोकमानस, इतिहास यांचा अभ्यास करण्यास मदत होते.

## संदर्भ

(१) जोशी, लक्ष्मणशास्त्री व इतर (सं०) : 'मराठी विश्वकोश', खंड-२, म० रा० साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९७६, पृ० ९११.

(२) आपटे, वा०गो० (सं०) : 'विस्तारित शब्दरत्नाकर', वरदा प्रकाशन प्रा० लि०, पुणे, पुनर्मुद्रण, मे १९९८, पृ० ४५८.

(३) सराफ, विश्वास : 'माणकेश्वरची श्री सटवाई देवी', तरुण भारत, २२ ऑक्टोबर २००४, पृ० २.

(४) Deo, Prabhakar : 'Temples of Marathawada', Publication Scheme, Jaipur, 1993, Page 58.

(५) पठाण, यू०म० (सं०): 'मराठवाड्यातील मराठी शिलालेख', जाने० १९८९, कुलसचिव, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद, पृ० १८.

(६) Deo, Prabhakar : उनि., पृ० ५९. ■





अनुक्रमणिका

# एक भाषानुभव : स्थळ सोलापूर

राजशेखर शिंदे

## प्रास्ताविक

प्रस्तुतच्या लेखात सोलापूर शहरातील बोलीभाषेची काही वैशिष्ट्ये शोधण्याचा प्रयत्न केला आहे. शास्त्रीयदृष्ट्या विचार करता सोलापुरी बोलीभाषा ही स्वतंत्र बोली ठरत नाही. कारण सोलापुरी भाषेची प्रमाणभाषेहून वेगळी अशी भाषिक रूपे सिद्ध झालेली नाहीत. बोली होण्याकरिता स्वतंत्र शब्दरूप, अर्थरूप, औचारिक रूप सिद्ध व्हावे लागते. प्रमाणभाषेहून दुसऱ्या भाषेइतकी बोली वेगळी नसते; पण वेगळेपण जाणवतो. असा वेगळेपणा सोलापुरी बोलीभाषेत जाणवत नाही. सोलापुरी बोलीभाषेत काही वैशिष्ट्ये प्रमाणभाषेहून वेगळी जाणवतात. ती वैशिष्ट्ये जाणवतात त्या सोलापूर शहरातील उद्योगधंदे, बहुभाषिक लोक यामुळे. त्या लोकांच्या बोलीची वैशिष्ट्ये पाहण्यापूर्वी सोलापूर शहराचे वैशिष्ट्यपूर्ण रूप आधी पाहू.

## सोलापूरची रचना, व्यवसाय व सामाजिक स्थिती यांचा भाषेवरील प्रभाव

सोलापूर हे गिरणगाव म्हणून प्रसिद्ध होते. अशा कामांकरिता अल्पशिक्षित, प्रशिक्षित कामगारांची आवश्यकता असते. ती गरज मोठ्या प्रमाणात शेजारील कर्नाटक व आंध्रप्रदेश या राज्यांमुळे पूर्ण होई. मध्यकाळापासून सोलापुरात शेजारच्या परगण्यातील लोक सोन्नलग्यात (सोलापुरात) येत राहिले. शहराच्या नैर्ऋत्येस कर्नाटकातील गुलबर्गा जिल्हा व दक्षिणेस बिजापूर जिल्हा तर दक्षिणपूर्वेला आंध्रप्रदेशातील हैदराबाद जिल्हा असे शेजारील प्रदेश. यांत अंतर जास्त नसल्याने येथे मध्ययुगापासून लोकांचा ओघ येत राहिला.

सामाजिक स्थितीचा विचार केल्यास हे शहर बहुधर्मीय आहे. मोठ्या प्रमाणात हिंदू धर्मीय आहेत. पुन्हा त्यामध्ये ब्राह्मण, लिंगायत, मराठा, वीरशैव, चांभार, ढोर, मातंग, साळी, सावजी तसेच बौद्धधर्मीय, जैनधर्मीय, ख्रिश्चनधर्मीय आणि हिंदूंच्यानंतर मोठ्या प्रमाणात मुसलमान आहेत. याशिवाय पारधी, लमाणी (लमाण), वैदू, कुडमुडे वैदू, दोशी, ग्वल्ल, भिल्ल अशा जमातीसुद्धा आहेत. आणि हे लोक आपापल्या भाषेसह आहेत. त्यामुळे हिंदी, मराठी, कन्नड, तेलुगु या भाषांच्या संपर्कामुळे मराठीची काही वैशिष्ट्यपूर्ण रूपे येथे पाहायला मिळतात.

### (१) अनादरकारक नपुंसकलिंगी रूपे

बोलीभाषेत प्रमाणभाषेची अपभ्रष्ट रूपे वापरली जातात. ही रूपे प्रमाणभाषेपासून वेगळी सिद्ध होत नाही. ती आणखी एकदोन वर्ण घेऊन आलेली आहेत. सोलापुरी बोलीभाषेत सर्वनामाची रूपे फार मजेदार होतात. उदा०,

हा - ह्यनंऽऽ, एकवचनी रूप ह्यनीऽऽ अनेकवचनीरूपी

तो - तनंऽऽ एकवचनीरूप, त्यवनी अनेकवचनी रूपे

ही - हिनंऽऽ एकवचनी रूप, ह्यनी अनेकवचनी रूपे व आदरार्थी

ती - तिनऽऽ एकवचनी रूप

ते - तनीऽऽ एकवचनी, त्येनी अनेकवचनी व आदरार्थी

या - ह्यवनी

त्या - त्यवनी

अशी सर्वनामांची रूपे उपयोजिली जाताना दिसतात. अनुल्लेखाने बोलता बोलता सोलापुरी बोलीभाषेत अनुस्वाररूपी खडा मारण्याची जहाल प्रवृत्ती आहे. उदा०,

'हेब्‌ग् हे अलं! / ह्यबग हे आलंः', 'त्येबक् ते आलं!/ त्यबक् ती आलं!', 'त्येबक ते तित् पडलंय!/ त्यबकऽऽ तितऽऽ पडलाय!' इत्यादी, इत्यादी.

एकवचनी सर्वनामी रूपांचे - 'हे', 'ते', 'ह्यबक', 'त्यबक' अशी नपुंसकलिंगी रूपे योजिली जातात. अशा स्वरूपांच्या नपुंसकलिंगी रूपांमधून न्यूनत्व, गौणत्व दर्शविले जाते. शिवाय आले या 'एकारान्ती क्रियापदाचे अकारान्ती रूप न्यूनत्व दर्शविते. आलं/ अलं, गेलं अशी रूपे करून अधिक्षेप दर्शविला जातो; कधी नापसंती आणि तुच्छताही दर्शविली जाते. तद्‌वतच अनौचित्यही अपेक्षित असते.

### (२) क्रियापदांची संयुक्त रूपे

प्रमाणभाषेत व लिखितस्वरूपाच्या शुद्धाशुद्धविवेकात शब्दांतील वर्णांचा स्वतंत्र आणि स्पष्ट उच्चार असतो. प्रमाणभाषेत उच्चारांचेही नियमन केले जाते. बोलीभाषेत औच्चारिक नियमन केले जात नसते. बोलीभाषेत कर्मालाच क्रियापदाचे रूप दिले जाते. आणि अक्षरे जोडाक्षरे केली जातात. उदा० अल्ता, गेल्ता, अल्ती, जेव्लो, जेव्ल्ये, हन्ला, फेक्ला, झोप्ली, इत्यादी.

बोलून मोकळे होण्याची घाई, न्यूनगंड, अज्ञान यामुळे असे घडते. क्रियात्मक रूपांपुढे क्रियापदाचे पूर्णत्व देण्याची गरज वाटत नाही; त्याबाबतीत अज्ञान हेच खरे कारण म्हणावे लागेल. 'तो गेलेला' असे क्रियापदविरहित वाक्य गेलेला 'होता/नव्हता' असे क्रियापद अपेक्षित असते. होकारार्थी किंवा नकारार्थी रूप अपेक्षित असताना ते बहुधा होकारार्थी क्रियापदाचे रूप अध्याहृत असते. गेल्ता/गेल्ती अशा रूपांच्या उपयोजनेतून क्रियेच्या पूर्णतेची संदिग्धताच नष्ट केली जाते.

### (३) लिंगनिश्चितीमधील गोंधळ

लिंगनिश्चितीच्या बाबतीत सोलापुरी भाषेत खूप मोठा गोंधळ दिसतो. व्यक्तीच्या बाबतीत शंभर टक्के अचूकता असते; परंतु शब्दरूपांच्या बाबतीत हा गोंधळ शंभर टक्के आहे. चहा, कॉफी, भात, ट्रक, एस्०टी० इत्यादी शब्द नेहमीच 'गोंधळ घालतात.'

(१) चहा-पुलिंगी शब्द. पण योजणाऱ्याच्या लिंगाप्रमाणे तो स्त्रीलिंगी/पुलिंगी होतो.

(२) कॉफी-स्त्रीलिंगी शब्द. पण योजणाऱ्याच्या लिंगाप्रमाणे तो स्त्रीलिंगी/पुलिंगी होतो.

(३) एस्०टी० बस स्त्रीलिंगी शब्द. स्त्रीलिंगी उपयोजन.

(४) ट्रक-पुलिंगी शब्द मात्र तो स्त्रीलिंगी योजतात.

कन्नड, हिंदी, तेलुगु या भाषांच्या अतिवापरामुळे लिंग व्यवस्थापनातील गोंधळ दिसतो. सुघड भाषारूपाची आवड नसणे, शब्दरूपाचे नेमके अज्ञान असणे व भाषा या सुंदर माध्यमाची अनास्था इत्यादी कारणे सांगता येतील.

### (४) हेलयुक्त रूप

बोलीभाषेत नादमधुरता असते. त्या नादमधुरतेमुळे बोलीमधील गोडवा वाढतो. नादासह लय अपेक्षित असते. लय संवेदनक्षम असते. बोली अनेक भाषांच्या संपर्कात येतात. तेव्हा लयीची मात्रा वाढते. मूळ उच्चारापेक्षा वाढलेल्या मात्रेच्या लययुक्त औचारिकरूपाला 'हेल' म्हणतात.

सोलापुरी भाषेत हेलकारी शब्दांची योजना असते. कन्नड आणि तेलुगु या भाषांचा हा परिणाम. मराठीत कानडीच्या 'आ'कार आणि 'उ'कार युक्त 'ओ'कार हेल अधिक आहेत. बंदिल्ला, उंडिल्ला, बित्तिल्ला, होगिल्ला अशी 'ल्ला' युक्त म्हणजे 'आ'कारयुक्त शब्दयोजना मोठ्या प्रमाणात आहे. माडबेक्कू, होगबोक्कू, उनबेक्कू, आडबेक्कू अशी आज्ञार्थी 'ऊ'कारयुक्त शब्दरूपेही कानडीत मोठ्या प्रमाणात आहेत. कानडीत, 'अ', 'उ', 'आ', 'ऊ', 'ओ' अशी हेलकारी रूपे अनेक आहेत. कन्नड भाषकांच्या संपर्कामुळे सोलापुरी बोलीभाषेत हेलयुक्त रूपे आहेत. 'अलावंऽऽऽ', 'गेलावंऽऽ', 'जेवलावंऽऽ', 'वसलावंऽऽ', 'खल्लावंऽऽ' असे 'अ'चे हेल आहेत.

'येकिब्बेऽऽ,' 'जाकिब्बेऽऽ' असे 'अबेऽऽ', 'तूबेऽऽ' असेही हेल काढले जातात. असे 'ए'कार युक्त हेलही कानावर येतात. आलोऽऽ, गेलोऽऽ, जात्तोऽऽ, गेल्तोऽऽ, व्हतोऽऽ, झझोपतोऽऽ इत्यादी. 'ओ'युक्त हेलपद्धतीची प्रवृत्ती दुणावत असलेली दिसून येत आहे. 'अ'कारयुक्त हेल तेलुगूचा तर 'उ', व्या, 'ओ' असे हेल कानडीपासून निर्माण होतात. कानडीच्या संपर्कामुळे ती प्रवृत्ती मराठीत डोकावत आहे. तसेच शुष्क, कोरडे तापमान, ओसाड भाग, कामधंद्याचा अभाव यांमुळे जीवनव्यवहारात त्रस्तता आहे. या वृत्तीमुळेही हेल काढले जातात. ■

# देवयानीची भाषा

**सानिया**

आम्ही बंगलोरला आलो तेव्हा देवयानी एक वर्षाची होती. तिचा जन्म मुंबईचा. वर्षाचा वाढदिवस बंगलोरला झाला. तिने बोलायला सुरुवात केली तेव्हा तिच्या-भोवती अनेक भाषा होत्या. माझी मराठी, घरातली तमिळ. बाहेरची कन्नड. मी घरात इतरांशी इंग्रजी आणि अम्मांशी हिंदी बोलत होते. आम्ही ठरवले की देवयानीने मला मराठीतले आई म्हणायचे आणि वडिलांना तमिळमधले (ए) आप्पा म्हणायचे. मी तिच्याशी मराठीत बोलायचे आणि इतरांनी तमिळ. जितक्या सहज आम्ही हे ठरवले तितक्या, किंबहुना अधिक सहजपणे ते जमले. आपापल्या भाषेच्या उपयोगावर विश्वास असल्याने असेल.

देवयानीने या दोन्ही भाषा वापरायला सुरुवात केली. कुणाशी कुठली बोलायची याबाबत तिचा कधीही गोंधळ उडाला नाही. ती जशी मोठी होत होती, जसे तिचे जगाचे आकलन होत होते तशी ती या भाषा बोलून संवाद साधत होती. भराभर शब्द शिकत होती. ती अडीच वर्षाची असताना शेजारच्या खेळघरात जायला लागली. घरात तिच्या कानावर इंग्रजी पडत होते त्यामुळे असेल तिथे इंग्रजी समजायला तिला मुळीच अडचण पडली नाही. शिवाय याबरोबरीने तिला कन्नड समजू लागले, हिंदी देखील.

मी तिच्याशी एकटीच मराठी बोलत होते. कटाक्षाने फक्त मराठीच. भोवती कुणी मराठी बोलणारे नव्हतेच. तिने कधी शब्दांची मिसळण केली नाही. परिस्थिती अशी तयार झाली की ती उत्तम तमिळ बोलू लागली; पण माझे तमिळचे ज्ञान यथातथाच होते. मला थोडे फार समजू लागले; पण मी बोलत नव्हते. अनेकदा मी तिला 'अम्मांना अमुक एक समजावून सांग' असे मराठीत सांगत असे आणि ती ते तमिळमध्ये त्यांना व्यवस्थित पोचवत असे.

मी जशी तिला चांगले मराठी यावे अशी धडपड करत होते तशीच अम्मा तमिळ-बाबत करत होत्या. असे आम्ही ठरवलेलेच असल्याने तो एक आनंददायक अनुभव होता.

ती दोन-अडीच वर्षाचीच असेल. आम्ही दोघी एक दुकानात गेलो होतो. तिथे एक बाई, बहुधा आमचे बोलणे ऐकून माझ्याशी बोलायला आल्या. त्या मराठी होत्या आणि 'कुठे राहता' वगैरे गप्पा सुरू झाल्या. देवयानी अतिशय चकित झाली. मला म्हणाली, ''अग आई यांना आपली भाषा येते बघ.'' तोपर्यंत तिने कुणाला मराठी बोलताना ऐकलेलेच नव्हते. भोवती कुणी नव्हतेच आणि त्या काळात मराठी टीव्ही

नव्हता. तिला वाटत होते की ही फक्त आम्हा दोघींचीच भाषा आहे. आई आणि मुलीची भाषा. वेगळी आणि खास. किती सुंदर कल्पना.

पुढे ती शाळेत हिंदी शिकायला लागली. त्यामुळे तिला देवनागरी लिपी लिहिता येऊ लागली. तोपर्यंत इतर लोक मराठी बोलतात हे तिला माहीत झाले होतेच. काही काळ माझी बहीण बंगलोरला शिकायला आली होती. माझी आईदेखील आमच्याकडे राहायला होती. देवयानीची मराठी उत्तम होत गेली. तितकीच तमिळही. अम्मा तिला गोष्टी सांगत आणि अनेकदा म्हणत की ती शब्द फार अचूक वापरते.

या काळात अर्थात मी तिला पुस्तके वाचून दाखवत असे. पुढे तिला वाचनाची अतोनात आवड लागली. इंग्रजी शाळेत जात असल्याने तिचे वाचन त्या भाषेतल्या पुस्तकांचे होते. मग मी तिच्यासाठी मराठी कविता, बोलगाणी अशी पुस्तके आणली. देवयानी ती वाचायला लागली. मग मला वाटत होते तसेच झाले. ती लिहायला लागली.

तिने कविता लिहिल्या. मग डायरी लिहू लागली. तिचे बरेच लेखन इंग्रजीत होते. माझी आई मुंबईला परत गेली त्या काळात मी तिला आजीला मराठीत पत्रे लिही म्हणून उत्तेजन दिले. तिला देवनागरी लिहिता येत होतेच तेव्हा मी सुचवले की जसे आपण बोलतो तसे लिहीत जा. तिने ते केले. करता करता तिने मराठीत देखील कविता लिहिल्या.

नंतर काही काळ आम्ही सिंगापूरला राहत होतो. आमच्या इमारतींच्या समूहाचा परिसर खूप मोठा होता. तिथे तऱ्हेतऱ्हेचे आंतरराष्ट्रीय म्हणावेत असे लोक राहत होते. अनेक भाषा. सगळ्याची मिळून अशी इंग्रजी. तिथे माझी पहिली जपानी मैत्रीण मला भेटली. ती मिचिको. तिची मुलगी जपानी शाळेत शिकत होती आणि तिला इंग्रजीचा गंध नव्हता. तोमोमी तिचे नाव. देवायानीच्याच वयाची. नऊ-दहा वर्षांची. तरीही मी आणि मिचिको भेटत असू तेव्हा या दोघी मुली एकत्र खेळत असत. भाषेशिवाय त्यांचे एकमेकींशी छान जमत असे. कधीही अडले नाही त्यांचे. तोमोमीने देवयानीचे नाव जपानी लिपीत लिहून दिले होते. आणि देवयानीने मराठीत. तोमोमीचे वडील एकदा जपानला गेले तेव्हा तिने देवयानीसाठी खेळण्यातली चिव चिव करणारी एक सुंदर जपानी चिमणी आणायला सांगितली. भाषेपलीकडे जाणाऱ्या दोन लहान मुलींच्या मैत्रीचे ते लोभस प्रतीक होते.

तोमोमीने तिच्या वाढदिवसाच्या पार्टीला वर्गातल्या जपानी मुलामुलींना बोलावले होते. त्यात देवयानीलाही आमंत्रण. ती एकटीच जपानी न जाणणारी. बाकी सगळे फक्त जपानी बोलणारे; पण त्या एकत्रित मौजेला भाषेची अडचण जाणवली नाही.

आम्ही सिंगापूरला असताना बसने इकडे-तिकडे खूप फिरत असू. त्या प्रवासात शब्दांचा एक खेळ खेळायला सुरुवात केली. मी एक मराठी शब्द सांगायचा, आजूबाजूला





अनुक्रमणिका

दिसणाऱ्या एखाद्या गोष्टीचे वर्णन करणारा, मग तिने त्याचे शेवटचे अक्षर घेऊन दुसरा सांगायचा. अशी शब्दांची साखळी तयार करायची. त्यातून अनेक गोष्टींना मराठीत काय म्हणतात ते आपोआप समजत जायचे.

अशी तिची भाषा सहजपणे, अस्खलित तयार झाली. शाळेत इंग्रजी होते, तिथल्या सगळ्यांशी इंग्रजीतच संभाषण, याखेरीज भरपूर वाचन. घरी तिचा आईशी मराठीत, आप्पाशी तमिळमध्ये संवाद. खेरीज आम्ही दोघे एकमेकांशी इंग्रजीत बोलत होतो ते कानावर. एक भाषेतून दुसरीत पटकन ये-जा करायला छान जमत गेले.

सतत जुनी हिंदी गाणी ऐकण्याच्या माझ्या छंदामुळे देवयानीलाही ती गोडी लागली. त्यातले शब्द समजून घेण्याची आवड तयार झाली. बंगलोरला शेजारी कन्नड बोलणारे असल्याने थोडी तीही येऊ लागली. यातून भाषेतली साम्यस्थळे लक्षात आली. गमती कळल्या. मजा-मजा करता आल्या.

मुलांना अनेक भाषा सहज शिकता येतात हे संशोधनाने सिद्ध झालेले आहेच. भाषाच काय पण अनेक कला, कौशल्ये, विषय हे देखील भराभर शिकण्याची त्यांच्यात क्षमता असते हेही मान्य झालेले आहे. फक्त निवड करावी लागते. आपले अग्रक्रम ठरवायला लागतात. मोकळेपणाने शिकू, बहरू, द्यायला लागते. आपल्यातही ते असायला लागते.

आता मागे वळून पाहताना समजते की हे सारे आतल्या ऊर्मीने झाले. मुद्दाम काही अभिनिवेशाने, ध्येय गाठायचे असे आम्ही ठरवले नव्हते. अनायासे भोवती एवढ्या भाषा आहेत तर आमच्या मुलीने त्या शिकाव्यात. फक्त इंग्रजीत शिक्षण घेणार, आई-वडील मिश्र भाषेतले म्हणून संकुचित चौकटीत अडकून पडू नये असे वाटत होते. भाषा हे आकलनाचे आणि आविष्काराचे साधन आहे. ते पुरेसे अवगत नसेल तर समजून घेण्याला आणि प्रकट करण्यालाही अडसर येतात. आकलनच नीट होत नसेल तर विचार शक्ती वाढीला कशी लागेल? मग नव-नव्या संकल्पना कशा निर्माण होतील? मेंदूच्या क्षमतेबद्दल आता आपल्याला पुष्कळ कळू लागले आहे. पण तो मेंदू आपल्या डोक्यात आहे. त्याच्या संवर्धनासाठी आपल्याला जाणीवपूर्वक काही करायला लागते.

भाषा हे एक सुंदर साधन आहे ज्यामुळे आपण स्वतःला माणूस म्हणवून घेतो. मग ते साधन आपल्याभोवती असताना प्रेमाने ते वापरायचे. त्यात आनंद असतो. समृद्धी आपोआप येते.

■

# माझे नामबंधू

हरिश्चंद्र बोरकर

'माझे नाव हरिश्चंद्र प्रभाकर बोरकर. राहणार रेंगेपार, तहसील साकोली, जिल्हा भंडारा.' आकाशवाणीच्या नागपूर केंद्रावरून तेव्हा प्रसारित होणाऱ्या 'बालविहार' या कार्यक्रमाकरिता माझ्या शिक्षकांनी हा माझा परिचय कितीदा तरी रटवून घेतला होता. अरविंदमामा ऊर्फ अरविंद जहागिरदार यांचा हा कार्यक्रम त्या काळात आम्हा सर्वांचा अतिशय आवडता कार्यक्रम असायचा. पुढे अरविंद जहागिरदार यांच्याशी संबंध वाढले आणि त्यांच्या जहागिरदारीत मी केव्हा सामील झालो ते कळलेच नाही. पण वीसबावीस श्रुतिकांच्या रूपाने ते दिवस आजही तसेच ताजे आहेत. गोविंद गोडबोले भेटले की ते दिवस आजही ताजेतवाने होऊन मनाला बिलगायला लागतात.

तसे पाहिले तर वरील परिचय केवळ तेव्हाच देऊन कार्यभाग संपत नव्हता. कारण घरी येणारा प्रत्येक पाहुणा येताक्षणीच विचारायचा, 'तुजा नाव का आये?' आणि मग मला तार स्वरात सांगायला लागायचे, 'माझे नाव...' अनेकदा तर पाहुणा घरात प्रवेश करताक्षणीच मी ताबडतोब आपला हा परिचय सांगायला लागायचो. तेव्हा तो पाहुणा आश्चर्यचकित होऊन म्हणायचा, 'बापा, पोराना तं माज्या मनातला सवाल वरकलन. तुमचा पोरगा नक्की मोटा डगर जानकार मानोस बनल.' आता हा पाहुणा काय विचारणार हे मला नेहमीच्या अनुभवामुळे माहिती होते. यावरून त्याने ही भविष्यवाणी वर्तविणे म्हणजे सुताने स्वर्ग गाठण्यासारखेच नव्हते काय?

'माझा जिल्हा भंडारा आहे' हे मी जेव्हा सांगतो तेव्हा आजही अनेकांच्या मनात प्रचंड प्रश्नचिन्ह उमटलेले मला त्यांच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसते. 'भंडारा? कुठला भंडारा?' असा बालिश प्रश्न विचारणाऱ्यालाही आपण बालिश आहोत याची किंचितही लाज वाटत नाही. तर कोणी कर्णबधीर विचारतो, 'काय? भंडारदरा म्हणालात?' तेव्हा आपले उच्चारण करण्यात काही गडबड असावी असा मला संशय येतो. किंवा त्या ऐकणाराच्या कानात तरी बधिरतेने ठाण मांडले असावे असा मी मनोमन निष्कर्ष काढून मोकळा होतो.

तसा कोणी आपल्या कपाळासही भंडारा लावत असतात. तिकडे तुकारामांचा भंडारा प्रसिद्ध आहे. एकदा आमच्या भंडारा शहरात शिंपी समाजाचे अधिवेशन होते. त्याच्या उद्घाटनाकरिता थेट बंगालहून त्यांचे ज्ञातिबांधव यायचे होते. त्यांनी आपल्या इंग्रजीतील उद्घाटकीय भाषणात हा भंडारा वाखाणताना त्यास तुकारामांच्या भंडाऱ्यापर्यंत पोहोचविले

होते. त्यांचे ते इंग्रजी भाषण त्या समारंभाच्या स्मरणिकेतही प्रकाशित झाले होते.

साकोली हे ग्रामनाम तसे वेगळे आहे. पूर्वी येथील हवामान इतके दमट होते की येथे येणारा नवीन माणूस हटकून आजारी पडायचा आणि अल्प वेळातच त्याला सकुली म्हणजे तिरडी स्वीकारावी लागायची. त्यामुळे या गावाला 'सकुली' हे नाव पडले आणि कालांतराने त्याचेच रूपांतर 'साकोली' झाले असा भाषातज्ज्ञांचा दावा आहे. तर सहा कोहळी येथे आले आणि त्यांनी हे गाव वसविले; त्या कारणाने या गावाला 'साकोली' हे नाव पडले असेही काही लोक मानतात. असे हे नाव अख्ख्या जगात एकमेव असावे, असा माझा समज होता. पण मी एकदा कोल्हापूर येथे गेल्यानंतर मात्र तो गैरसमज ठरला. कारण कोल्हापुरच्या बस-स्टँडवर एक सिटी बस 'साकोली' या नावाची आढळली. मला वाटले की ही आपल्या साकोलीलाच जाणारी बस असणार. पण नंतर कळले की कोल्हापुरात साकोली नामक एक मोहोल्ला म्हणजे उपविभाग आहे. त्यामुळे पर्यायाने माझ्या लाडक्या साकोलीचेही एकमेवाद्वितीयत्व त्याच क्षणी संपुष्टात आले.

माझ्या गावाचे नाव रेंगेपार हे आहे. त्याचा तसा मूळ परंपरागत उच्चार 'रेंगोपार' असा आहे. 'रेंगो' हा खास गोंडी भाषेतील शब्द असून त्याचा अर्थ 'बोर' असा होता. त्यामुळे रेंगेपार हे बोरकरांचे मूळ गाव ठरते. हाच शब्द रेंगाबोडी व रेंगोडा या दोन ग्रामनामांमध्ये आढळतो. पण रेंगेपार हे ग्रामनाम इतके लोकप्रिय आहे की केवळ भंडारा जिल्ह्यात या नावाची तब्बल आठ खेडी आहेत. त्यांची वेगळी ओळख दिसावी म्हणून अशा गावास काही तरी 'तीट' लावायची प्रथा आहे. म्हणजेच रेंगेपार (बुराड्या) किंवा रेंगेपार (कोठा) अशाप्रकारे. आमच्या रेंगेपारला त्या काळी होली म्हणजे वाजंत्री जातीची दोन-तीन घरे होती. विवाह समारंभापासून तर अंत्यसंस्कारापर्यंत वाजंत्री मिळणार ती आमच्याच गावी. त्यामुळे आमच्या गावास 'होल्यांचा रेंगेपार' असे म्हणायचे. पण पन्नास वर्षांपूर्वी मी आपल्या 'मराठ्यांची मर्दुमकी' नाटकाचे हस्तपत्रक छापताना रेंगेपार (कोहळी) असे छापले. त्यानंतर भारत-चीन युद्धावरील 'हळहळला हिमालय' याही नाटकाला तेच नाव छापले. आणि हा हा म्हणता ते नाव सर्वदूर पसरले. इतकेच नाही तर शासकीय स्तरावरदेखील या नामांतरास मान्यता मिळाली. पण त्यातही गडबड होते. अनेक लोक संक्षिप्तीकरण करण्याच्या नादात रेंगेपार (को०) असे लिहून जातात. आणि शेवटी को. म्हणजे कोठा की कोहळी असा पेच बिचाऱ्या पोष्टमनच्या मनास संभ्रमित करून जातो.

बोरकर हे कुलनाम सर्वत्र आढळून येते. आमच्या साकोली येथे कोहळी या जातीसह तेली, महार आणि खाती म्हणजे लोहारदेखील बोरकर कुलीन आहेत. या आडनावामुळे मला अनेक दलित नेत्यांकडे पाहुणचार घेता आला. शिवाय तिकडे कोकणात तर ब्राह्मणातही बोरकर कुलनाम असल्याकारणाने माझ्या पत्नीला बा०भ० बोरकरांच्या बोरीला

'या, आत या सूनबाई' असे म्हणून घरात साडीचोळी दिली गेली. इतकेच नाही तर तिकडे पावस येथे हातात आरती धरण्याचेदेखील भाग्य याच आडनावामुळे आम्हा उभयतांना लाभले.

माझ्या वडिलांचे मूळ नाव पगा असे होते. रघा आणि पगा अशी या दोन भावंडांची नावे होती. नंतर रघा हे नाम रघुनाथ झाले, तर पगा या नावाऐवजी प्रभाकर असे करण्यात आले. आम्ही शिकत होतो तेव्हा वीज यायची होती. तो कंदिलाचा जमाना होता. त्यातही 'प्रभाकर' नावाची कंदील बनविणारी कंपनी तेव्हा अधिक प्रसिद्ध होती. जेथे तेथे तेच प्रभाकर कंदील दिसायचे. त्यामुळे आमचे मित्र मला 'प्रभाकर' किंवा 'कंदील' या नावाने हाक मारून चिडवायचे. पण प्रभाकर या नावात मुळातच 'भाकर' असल्यामुळे हे नाव मला आवडायचे. पुढे कळले की प्रभाकर आणि भाकर यांच्यात लवलेश संबंध नाही. आणि असलाच तर तो केवळ नावापुरताच आहे. तरीही प्रभाकर, भास्कर व भाकर या त्रिकुटातील संगती मला आजही विचार करायला लावते.

माझ्या 'हरिश्चंद्र' या नावाचे सुलभ रूप 'चंदू' असे केव्हा उदयास आले ते मला आज आठवत नाही. पण माझ्या वडिलांपासून तर अगदी जवळच्या मित्रांपर्यंत माझे सारे सुहृद मला पूर्वी याच नावाने हाक मारायचे. हळूहळू मी वयाने व देहाने वाढत गेलो. नात्याने व मानानेही वाढायला लागलो. आणि या नावापासूनही मी दूरदूर जायला लागलो. आता नाव न घेता मला 'भाऊ' किंवा 'दादा' असे सारे म्हणायला लागले. तरीही गर्दीत कोणीतरी 'चंदू' या नावाने अवचित एखाद्यास हाक मारायला लागला आणि ती हाक माझ्या कानावर आली की आपल्याला कोणी जुन्या आप्तेष्टाने तर हाक मारली नाही ना, असा मला भास होतो आणि मी तेथे सैरभैर पाहात घुटमळायला लागतो.

माझे हरिश्चंद्र हे नाव तसे उच्चारायला कठीण असले तरी पाटलाच्या पोराचे नाव आपल्याही पोराला असावे असा अट्टहास तेव्हाही अनेकांकडे होता. त्यामुळेच माझ्या गावी माझे दोनतीन समवयस्क 'हरिश्चंद्र' या नावाचे होते. अर्थात त्यांच्या नावाचा उच्चार सोपा करून 'हरिचंद' असा लोकांनी बदलला होता. त्यांच्यापैकी एक अल्पजीवी ठरला; तर दुसरा कायमचा मतिमंद होता. आजही तो माझ्या समोर आला की तो आपला हात पसरतो आणि मी देखील त्याच्या ओंजळीत आपला खिसा रिता करतो.

मी शिक्षक असताना शाळेत मात्र परिचय करते वेळी माझे हरिश्चंद्र हे नाव फार उपयुक्त ठरायचे. सर्व मुलांनी आपला परिचय सांगितला की शेवटी माझ्यावर पाळी यायची. मग मी त्यांना माझे नाव लिहायला लावत असे. तेव्हा चाळीसपैकी पस्तीस विद्यार्थी माझे नाव न चुकता चूक लिहीत असत. शाळकरीच विद्यार्थी नाही तर अगदी महाविद्यालयीन विद्यार्थ्यांमध्ये देखील चुकांचे प्रमाण हेच कायम असे. किंबहुना अध्यापक

महाविद्यालयांतील पदव्युत्तर शिक्षण घेतलेले विद्यार्थिदेखील या नियमास अपवाद ठरायला कदापि तयार नव्हते.

आपल्या बाळाचे नाव ठेवण्याचा अग्रहक्क आईला असतो. त्या बाबतीत वडीलदेखील अनेकदा लुडबूड करतात. कधीकधी बाळाची थोरली बहीण किंवा आत्याही या सत्कार्याकरिता अग्रेसर असते. पण बालपणी मोठ्या प्रेमाने दिलेले हे नाव बदलविण्यास नंतर मात्र सारेच आपली आयुधे परजून सज्ज असतात. त्यांच्या या कृतीलादेखील प्रेमाने 'नावे ठेवणे' हीच संज्ञा दिली जात असते. माझ्यासह सर्वांनाच आपल्याला लोकांनी सन्मानपूर्वक केलेले हे पदवीदान आठवत असेलच. पण मूळ नाव लिहिताना होणाऱ्या चुकांमुळे त्या नावाला मिळणारे नवीन रूप निश्चितच मनाला वेदनादायक ठरणारे असते. माझ्या उपरोक्त शिष्योत्तमांनी स्वीकारलेले 'हरचंद, हरीचंद, हरिचंदर, हरीसचंद' हे विविध मौलिक पर्याय वाचूनही मी वाचलो; हे मी आपले अहोभाग्य समजायला हवे.

सध्या संक्षिप्तीकरणाचा जमाना आहे. नावाचे संक्षिप्तीकरण ही तर सार्वत्रिक प्रथा आहे. ती आपण इंग्रजांकडून घेतली असावी असा माझा समज आहे. पण इंग्रजीत केवळ नामाच्या आद्याक्षरानेच लिहिण्याची रूढी आहे. त्यामुळे अनेकदा गंमत घडते. तिकडे नवेगाव बांध येथे आमच्या बोरकरांकडे पांडुरंग व पंढरी ही नावे आहेत. त्यामुळे त्यांच्याकडील समस्त कर्क राशीय मंडळी आपले नाव 'एच०पी० बोरकर' असेच लिहितात. सेंदुरवाफा येथे प्रगती कॉलनीत चक्क महादेवराव शिवणकर यांच्या भव्य बॅनरखाली शुभेच्छुक म्हणून 'एच०पी० बोरकर' हे नाव नोंदले गेल्याचे मीच वाचले आणि क्षणभर अवाक् झालो. खजरी येथील नाटकाच्या हस्तपत्रकाने तर फारच मजा उडवून दिली. तेथे माझे 'अग्निपरीक्षा' हे नाटक होते. म्हणून नाटकाच्या शीर्षकाच्या वर लेखक म्हणून हरिश्चंद्र बोरकर हे माझे नाव होतेच, शिवाय त्या नाटकाचे उद्‌घाटक एच०पी० बोरकरसर होते. नंतर कळले की ते तेथे मुख्याध्यापक आहेत.

पण माझे हरिश्चंद्र हे नाव अजिबात कठीण नाही हे सिद्ध करणारे अनेक पुरावे माझ्याकडे उपलब्ध आहेत. ब्रम्हपुरी येथील आमचे एक कार्यकर्ते नेहमी आदराने माझ्या पायाला स्पर्श करतात आणि मला सांगतात की त्यांना शिकविणारे जे शिक्षक होते त्यांचेही नाव 'हरिश्चंद्र बोरकर' हेच होते आणि त्यांचाही स्वभाव अगदी माझ्यासारखाच होता. आपल्या प्रत्येक भेटीत ते आपले हे विधान हटकून पुनरावृत्त केल्याशिवाय राहत नाहीत.

एकदा तर भंडारा येथील जिल्हा कार्यालयात छान विनोद निर्माण झाला. तेव्हा झाडीबोली साहित्य मंडळाच्या नावनोंदणीचे काही काम भंडारा येथे आम्ही करत होतो. सोबत आमचे सहसचिव डॉ० घनश्याम डोंगरे होते. एक स्टँप घ्यायचा होता. म्हणून स्टँप व्हेंडरकडे गेलो. व्हेंडरने माझे नाव विचारल्यानंतर मी 'हरिश्चंद्र बोरकर' असे

सांगताच सारे हसायला लागले. आम्हाला त्या हसण्याचा काहीच अर्थ कळला नाही. नंतर उलगडा झाला की माझ्यापूर्वी जो मुलगा तेथे स्टँप घेऊन लिहायला उभा होता त्याचेही आडनाव तर 'बोरकर' हे होतेच, त्याशिवाय त्याच्या वडिलांचे नावदेखील तेच म्हणजे 'हरिश्चंद्र' होते. चौकशी केल्यानंतर कळले की तो मुलगा मौदा येथे कामास आहे आणि त्याचे मूळ गाव मांगली बांध हे आहे.

परवा तर यापेक्षाही अजब प्रकार घडला. आमच्या डॉ० राजन जयस्वालांचा दूरध्वनी आला, 'नमस्कार सर, आपण तुम्हाला मत देऊन मोकळे झालो.' त्यांनी मला कशाचे मत दिले ते मला काहीच कळले नाही. कारण मी आजपर्यंत कोणतीच निवडणूक लढविली नाही आणि त्या दिवशीदेखील कोणत्याच निवडणुकीला मी उभा नव्हतो. ते पुढे म्हणाले, 'काय सर, आम्ही सारे हरिश्चंद्राच्या फॅक्टरीतले. तुमचं नाव पाहिलं आणि मारला ठप्पा.' नंतर कळले की लाखांदूर येथील महाविद्यालयात 'हरिश्चंद्र बोरकर' याच नावाचे पाली-प्राकृत शिकविणारे एक प्राध्यापक आहेत आणि ते त्या सिनेटच्या निवडणुकीला उभे होते.

'नावात काय आहे,' असे कोणाला खुशाल म्हणू द्या. पण नावात बरेच काही आहे हे मी अनेकदा अनुभवले आहे. नुकतेच दिवंगत झालेले आमचे परममित्र द०सा० बोरकर यांच्याशी माझे नामसाम्य असल्यामुळे अनेकदा घोटाळा झालेला मी पाहिला आहे. विशेषत: परिचय करून देत असताना मी त्या व्यक्तीला मध्येच थांबवून 'तो मी नव्हेच' याची कबुली दिली आहे. अगदी आमचे गुरुवर्य डॉ० वि०स० जोग यांचीही एका देयकाच्या संदर्भात अशी एकदा फसगत झाल्याचे आठवते. त्यांनी तर चक्क द० सा० यांच्याकडील देयकाची मागणी मला केली होती.

नामसाधर्म्याचे घोटाळे माझ्या बाबतीत अनेकदा झालेले आहेत. आमचे मित्र हरिश्चंद्र निघोट यांच्या निधनाची वार्ता साकोलीकडे येऊन पोहोचली. पण वाटेत सारेच बदलले आणि निघोट यांच्याऐवजी बोरकर असे पसरले. झाले. माझी साकोलीस्थित कन्या रात्रभर सर्वांना उत्तरे देत थकून गेली होती. रेंगेपारला आमच्या घरीही अनेक दूरध्वनी आलेत. पण ते मुलांनी झेलले. कारण मी आत निवांत झोपलो होतो. सकाळी पंधरा ऑगस्टच्या निमित्ताने मी बाहेर पडलो तेव्हा सारेच माझ्याकडे विचित्र नजरेने पाहत होते. या प्रकरणाचा सारा उलगडा मला फार उशिरा झाला. 'युद्धस्य कथा रम्या' असे म्हणतात. त्याच चालीवर 'मरणस्य कथा रम्या' असे नवीन सूत्र तयार केल्यास ते अतिशयोक्त ठरू नये.

तशी मृत्यूच्या बातमीची उत्सुकता वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींना अधिक असते. एकदा माझा एक लेख नागपूरच्या दैनिकात यावयाचा होता. पण वेळेवर त्यांना माझे छायाचित्र त्यांच्याकडे सापडत नव्हते. म्हणून त्यांनी दुसऱ्या वर्तमानपत्रातील आपल्या मित्राकडे

छायाचित्राची मागणी केली. झाले. यांचा डोळा फडफडला. त्यांनी लागलीच भंडारा येथील आपल्या वार्ताहराला मध्यरात्री जागे करीत त्याच्याकडे विचारणा केली, 'काय हो, बोरकरांचं काही बरं वाईट?' भंडाऱ्याचा वार्ताहर आळस देत कंटाळून बोलला, 'बोरकरांचे काय होणार? थोड्या वेळापूर्वी तर आम्ही बोललो.' सकाळी त्या आमच्या वार्ताहर मित्राने हा सारा प्रकार वर्णन करून सांगितले, 'तुमच्या मृत्यूवर मोठा अग्रलेख तयार आहे बरं!' तेव्हा वाटले की तो लेख वाचायला तरी आपण वाचायला हवे किंवा आपल्या मित्रांना तो वाचायला मिळावा म्हणून तरी आपण मरायला हवे!

माझा परिचय देताना हटकून कविवर्य बा०भ० बोरकर यांच्याशी माझी तुलना करायचा मोह संचालनकर्त्याला आवरता येत नाही. तेव्हा तर मला राहवत नाही. कोठे बा०भ० आणि कुठे मी? तरी आपल्या बांधिलकीची आठवण देत आणि बा०भ० यांचा पूर्ण आदर करीत मुंबईच्या दादर येथील शिवाजी रंगमंदिरात पु०भा० भावे स्मृती साहित्य पुरस्कार स्वीकारताना मी म्हणालो होतो. 'मी बा०भ० बोरकर नाही, तर मराठीच्या साऱ्या बोलींना एका सूत्रात गुंफायला निघालेला हरिश्चंद्र बोरकर आहे.' तेव्हा तेथील दाटीदाटीने बसलेल्या अनोळखी श्रोत्यांनीही प्रचंड टाळ्या वाजवून मला उत्स्फूर्त प्रतिसाद दिला होता.

अनेकदा यजमानांकडून मलाही विचारणा होते, 'आपण कोकणातलेच का? की गोव्यातले?' तेव्हा मीदेखील कधीकधी ठोकून देतो, 'हो तर. मी तिकडचाच. अहो, आमचे पणजोबा तिकडून इकडे पूर्व विदर्भातील झाडीपट्टीत आलेत आणि येथेच कायमचे रहिवाशी झालेत. 'एकाने तर हरिश्चंद्र पाटील आणि कमलाकर बोरकर या दोन कोकणी नाटककारांशी माझी तुलना करून त्यांच्या नामसंकरातून, म्हणजे एकाचे नाव आणि दुसऱ्याचे आडनाव घेऊन 'हरिश्चंद्र बोरकर' हे माझे नाव सिद्ध करीत माझा परिचय देण्यात सार्थक मानले होते.

असो. मी मनात एक अतिशय गुप्त बेत आखला आहे. आपल्या या सर्व नामबंधूंना एकदा घरी पाचारण करावे. त्यांच्याशी मनमोकळ्या चर्चा कराव्या; त्याच्याशी हितगूज करावे. त्यामुळे निदान संभाव्य 'तोतयाचे बंड' उद्भवण्याचा धोका तरी टळेल. पण आपल्या धकाधकीच्या जीवनात हा बेत कधी तरी पूर्ण होईल काय? पाहू. 'काळ अनंत आहे...' वगैरे आमच्या भवभूतींनी म्हणून ठेवलेलेच आहे. आणि 'महाजनो येन गत: स पंथा:' असे म्हणतात ते काही उगीच नाही. ■

# 'वर्किंग लंच'

मला Working Lunch किंवा Business Lunch ह्या संकल्पनांसाठी मराठीत चपखल ठरेल असा प्रतिशब्द हवा आहे, त्यासाठी मदत करावी अशी मी विनंती करतो.

सकाळची न्याहरी अंमळ उशिरा, परंतु दुपारच्या जेवणाआधी घेण्याच्या व्यवस्थेला Brunch म्हटलं जातं. त्या 'तडजोडी'साठीही मराठी शब्द सुचवता आला तर तोही हवा आहे.

- विजय पाध्ये

झटपट याअर्थी चट असा शब्द मराठीत योजला जातो. अर्थात चटश्राद्धाकरताही त्याचा उपयोग केला जातो. पण तेवढाच उपयोग आहे, असंही नाही. शाळेतही एखादे शिक्षक अनुपस्थित असतील, तर त्यांच्या जागी अन्य शिक्षक जो तास घेतात, त्यालाही चटवर्ग म्हणतात. चटकन ह्या शब्दाचं ते कदाचित लघुरूपही असेल. तेव्हा चटभोजन असा शब्द कसा वाटतो?

- मनोहर राईलकर

'वर्किंग लंच'साठी 'लघुभोजन' हा शब्दप्रयोग कसा वाटतो? वर्किंग लंच म्हणजे यथेच्छ भोजन, स्नेहभोजन असा अर्थ नसून केवळ आहारिकेतून उपलब्ध करून देण्यात आलेले मर्यादित खाद्यपदार्थ एवढाच अर्थ घ्यावा; हे भोजनसदृश खाद्यपदार्थांचे सेवन करून मंडळींनी परत कामाला लागावं असं सुचवायचं असेल तर लघुभोजन हा शब्द पुरेसा व योग्य ठरेल काय?

- विजय पाध्ये

आहारिकेतून उपलब्ध करून देण्यात आलेले मर्यादित खाद्यपदार्थ एवढाच अर्थ अभिप्रेत असेल तर त्या शब्दात भोजन हा शब्द येण्याची काही आवश्यकता आहे का? अल्प आहार -- अल्पाहार म्हटले जर चालेल का?

- सुशान्त देवळेकर

Working lunch हे यथेच्छ तर सोडाच, नेहमी इतकेही बहुधा नसते. पण त्याला कारण कमी जेवणे (पथ्य) हा नसून जेवणास महत्त्व कमी आणि कामास अधिक असल्यामुळे नाइलाजास्तव जेवण्याच्या वेळी थोडेफार जेवण घेणे, पण त्यावर फार वेळ न दवडता तो कामासाठीच अधिकतम वापरणे असा उद्देश असतो. त्यामुळे Working lunch या शब्दात भोजनाच्या मात्रेपेक्षा/राशीपेक्षा (quantity) त्या झटपटणाऱ्या छटेची झलक दिसावी असे मला वाटते...

Snacksसाठी अल्पोपाहार असा शब्द आहेत. लघुभोजन (short lunch) हा शब्द brunchसाठी वापरता येईल.

नवशब्दनिर्मितीच्या बाबतीत वालावलकर सरांची बुद्धी तीक्ष्ण आणि अनुभव दीर्घ आहे. त्यांना काय वाटते तेदेखील जाणून घेऊ.

**- सलील कुळकर्णी**

अल्पाहार किंवा अल्पोपाहार अशा शब्दांना उगीचच वडापाव, एसबीडीपी, पावभाजी, सामोसे इत्यादींसारखे न्याहरीचे पदार्थ असा संदर्भ जोडला गेला आहे आणि आपल्याला तर मर्यादित स्वरूपात भाजी-पोळी, आमटी-भात द्यायचे आहे, जेणेकरून संपूर्ण व यथेच्छ भोजन नव्हे पण जेवण म्हणावं एवढे पुरेसे खाणं होईल असं सुचवायचं आहे.

**- विजय पाध्ये**

Working lunch च्या वेळी, lunchच्या ऐवजी किंबहुना lunchचेच अटकर, आटोपशीर रूप असल्यामुळे भोजन ह्या शब्दाचा समावेश असावा असे मला वाटते. अन्यथा तो अल्पोपाहार होईल, पण Working lunchमधील कामासाठी वेळ वाचवण्यासाठी केलेले भोजनाचे आटोपशीर स्वरूप हा अर्थ ध्वनित होणार नाही.

चहापानाच्या वेळी घेतलेला high tea हा आणखी एक वेगळा मधलाच प्रकार, चहाबरोबर नेहमीपेक्षा अधिक पण नियमित जेवणाच्या मानाने कमी असलेला आहार हा कदाचित अल्पोपाहारातून अधिक असल्यामुळे मध्यमाहार होऊ शकेल का?

**- सलील कुळकर्णी**

'वर्किंग लंच'साठी 'लघुभोजन' हा शब्द अर्थवाही वाटतो. आहार शब्दाचा अर्थ भोजन असा असला तरी 'अल्पाहार' शब्दात भोजनाची संकल्पना प्रतीत होईलच असे नाही. कदाचित पोहे, शिरा असे पदार्थ असू शकतील असे वाटते. झटपट भोजनात झटपट हे क्रियाविशेषण आहे. इथे 'झटपट संपविता येईल इतके जेवण' असा अर्थ घेता येईल. प्राप्त परिस्थिती काम-स्वल्पविराम-काम अशी असल्याने मधल्या वेळात घ्यायच्या

जेवणाला, 'स्वल्पभोजन' असाही शब्द योग्य ठराया. (जेवणासाठी 'जेमनम्' असा शब्द संस्कृत भाषेत आहे. 'म'चा 'व' होतो. जसे ग्राम - गाव)

**- य०ना० वालावलकर**

Working lunchविषयीच्या आपल्या संकल्पनेत काही गफलत होते आहे का? की भारतीय इंग्लिशमधील ही संकल्पना म्हणूया?

Working या शब्दाचा विशेषण म्हणून ब्रिटिश इंग्लिशमधील वापर आणि अर्थ यांविषयीची संपूर्ण नोंद पाहता त्यातील अर्थ क्र० ४ असा दिलेला आहे : A working breakfast or lunch is one at which you discuss business.

**- मिलिंद मालशे**

श्री० मालशे यांनी सांगितलेला अर्थच ठाऊक होता. भारतात किंवा महाराष्ट्रात इंग्रजी बोलताना अल्पभोजनाकरिता 'वर्किंग लंच' वापरत असल्यास हे प्रादेशिक अर्थांतर कितपत प्रचलित झालेले आहे?

**- धनंजय वैद्य**

'वर्किंग लंच'साठी 'लघुभोजन' काय किंवा 'चटभोजन' काय, दोन्ही शब्द योग्य वाटतात.

अमूक एखाद्या इंग्रजी शब्दाला मराठी पर्यायी शब्द देताना आपण फक्त एकाच पर्यायी शब्दापुरतं थांबण्याचा चिक्कूपणा करू नये. जे जे शब्द सुचविले जातील त्यातील ज्यांमध्ये इंग्रजी शब्दाची थोडीफार अर्थछटा आढळेल ते सर्वच पर्यायी शब्द म्हणून स्वीकारावेत.

'गंगाजळी-२'मधील 'वामकुक्षी' वाचताना वामकुक्षीला इंग्रजीत ब्यूटी स्लिप, फॉर्टी विन्क्स, कॅटनॅप, ब्लॅकेट ड्रिल असे चार शब्द दिलेले आढळले. बंगालीत भातभूत (भात खाऊन येणारी सुस्ती) असा शब्द आहे. त्यावरून वाटलं 'भातसूम्म' असा मराठी शब्द वापरायला काय हरकत आहे. थोडक्यात एका शब्दाला जास्तीत जास्त शब्द सुचविले जावेत आणि ते सर्व वापरायला हवेत, शब्दे किं दरिद्रता? (चू०भू०द्या०घ्या०)

**- उमेश करंबेळकर**

नी०ब० रानडे ह्यांच्या कोशात Lunch ह्या शब्दाचा अर्थच मुळी a slight repast between breakfast and dinner असा देऊन पुढे फराळ or फळार m, उपाहार m, मधल्या वेळचे खाणे n, उपभोजन n असे इतर आनुषंगिक शब्दही दिले आहेत. शिवाय Luncheon ह्या शब्दासाठी (मुख्य भोजन व न्याहारी यांमधील) अल्पाहार m असाही एक अर्थच्छटासूचक शब्द दिला आहे.

Lunchसाठी आपण केवळ दुपारचे भोजन/जेवण इतकाच रूढ अर्थ घेऊन शब्दप्रयोग करीत असतो.

वरील गोष्टीवरूनही सिद्ध होतंय की, एखाद्या शब्दाचा मूळ अर्थ काही का असेना, मराठीत (तरी; इतर भारतीय वा अन्यदेशीय भाषांमध्येही स्थानिक परिस्थितीनुसार अर्थसंकोच होऊन) निराळेच प्रतिशब्द योजले जातात व कालांतराने ते रूढ होऊन पक्के स्थान मिळवून बसतात.

तेव्हा, Working lunch ह्या शब्दासाठी अल्पभोजन हा शब्दप्रयोग पुरेसा अर्थवाही ठरेल असं वाटतं.

- विजय पाध्ये

## चर्चेत नव्याने सहभागी झालेल्या व्यक्तींचा अल्पपरिचय

(१) राईलकर, मनोहर : स०प० महाविद्यालय (पुणे) येथे प्राध्यापक व गणित विभाग-प्रमुख असे ३४ वर्षांचे अध्यापनकार्य केल्यावर निवृत्त.
(ई-पत्ता : railkar.m@gmail.com )

(२) वालावलकर, यशवंत ना० : पुणे येथील शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयातून अध्यापक पदावरून निवृत्त.
(ई-पत्ता : ynwala@gmail.com )

(३) वैद्य, धनंजय : जॉन्स हॉप्किन्स विद्यापीठ, बॉल्टिमोर, मेरीलँड, यू०एस०ए० येथे साहाय्यक प्राध्यापक.
(ई-पत्ता : deejayvaidya@gmail.com )

पुस्तक परीक्षण

# ग्राममंगलमधील भाषाशिक्षण

**शीला कोलटकर**

१

[परीक्षित पुस्तक : 'निळे आकाश, हिरवी झाडे, काळी माती'; लेखक : रमेश पानसे, प्रथमावृत्ती २०१२, प्रकाशक ग्राममंगल, पुणे; पृष्ठे - १०३, देणगी मूल्य ₹ २००]

शिक्षणप्रक्रियेतील एखाद्या ठिकाणी घडणारे नवनवीन प्रयोग इतरांना मार्गदर्शक ठरतात हे रमेश पानसे यांनी लिहिलेल्या 'निळे आकाश, हिरवी झाडे, काळी माती' या पुस्तकातून जाणवते. यातील लेखांमध्ये मुलांचे 'भाषाशिक्षण' या संदर्भात भाषा शिक्षणाचे सैद्धान्तिक विचार आणि ग्राममंगलमध्ये होणारे नवनवीन भाषिक उपक्रम यांची जोड आहे. या पुस्तकात आठ प्रकरणे असून तीन परिशिष्टे आहेत.

ह्या पुस्तकात श्रवण व भाषण-संभाषणाच्या संधींमधून वाचन व लेखन या भाषेच्या अनैसर्गिक क्षमतांची पूर्वतयारी केली जाते. परिचित शब्दांचा उचित वापर करून पुढील क्रिया एकत्रितरीत्या अनुभवांशी निगडित केल्या जातात - शब्द ऐकणे, बोलणे, वाचणे, लिहिणे, अर्थ समजणे, त्यांच वस्तूंशी, कल्पनांशी अर्थ बांधणे यातून 'शब्दानुभव' देण्याची प्रक्रिया उलगडते. मग याचाच वापर करून वाक्य तयार करताना 'कृतिशील पूर्णार्थ' मुलांमध्ये आपसूक रुजतात. त्यासाठी वेगळी साधननिर्मिती का व कशी करायची, याचेही थोडक्यात विवेचन यात आहे.

अध्ययन-अध्यापन प्रक्रियेत, मुलांना भाषा शिकविण्यापेक्षा भाषा आत्मसात करण्यासाठी संधी कशी देता येते, याची उत्कृष्ट उदाहरणे लेखकाने दिली आहेत. लेखक ग्राममंगलमधील भाषा-शिक्षणाचा परिचय करून देत असले तरी त्यातून भाषाशिक्षण प्रक्रियेची उकल होत जाते.

ग्राममंगलमधील भाषेच्या उपक्रमांना भरभक्कम तात्त्विक अधिष्ठान असल्याने, मुलांची अभिव्यक्ती वाचण्यातील गंमत अनुभवण्यासारखी आहे. कविता, लेख, कथा यातील अभिव्यक्ती मुलांच्या वयोगटाच्या मानाने अधिक प्रगल्भ वाटते. 'मी सामान्य माणूस बोलतोय' हे लेखन असो वा ऊर्वीच्या लेखनातील 'निसर्गात गेल्यावर कृष्णाची बासरी मनात येते' हा विचार विद्यार्थ्यांच्या भाषाविकासाची उत्कृष्ट उदाहरणे आहेत. अशी अनेक उदाहरणे 'वाटचाल वाङ्मयाकडे' या प्रकरणात मुलांच्या हस्ताक्षरात सापडतात. आंतरशाखीय भाषाशिक्षणात जुन्या नव्या वादांना स्पर्श केल्याचे जाणवते,

तसेच त्यातील विचारांचा समन्वयही मार्गदर्शक ठरतो. मराठी अभ्यासक्रम २०१२च्या कार्यवाहीसाठी यातील विचार निश्चितच उपयुक्त ठरतील. परिशिष्टात 'सेमी इंग्लिश'च्या प्रश्नाचाही विचार आला आहे.

या सर्वच लेखातील सैद्धांतिक विचार सोप्या भाषेतून असल्याने ते वाचकाशी संवाद साधतात, हे निश्चित घडू शकेल असा विश्वास देतात. या लेखकाच्या यापूर्वीच्या लेखनातील काही विचार पुनरुक्त होत असले तरी ते अनाठायी वाटत नाहीत. निरामय निसर्गाच्या सान्निध्यात झालेला हा विचार, त्या विचारांची उत्पादक अनुभवांत झालेली निर्मितिप्रक्रिया शीर्षकातून बोलकी होते. पुस्तकातील रेखाटने, चित्रे, मांडणी आशयाशी पूरक असल्याने वाचनाची गोडी वाढते. या पुस्तकाच्या माध्यमातून भाषाशिक्षणाची प्रक्रिया निश्चित आनंददायी होईल.

२

['पावसानंतरचे ऊन', लेखक : रमेश पानसे, प्रथमावृत्ती : ३१ मार्च २०१२, प्रकाशक : प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई, सातारा; : मूल्य ₹ ३०/-]

मानवी जीवनातील बदल वैयक्तिक व सामाजिक पातळीवर कसे घडावेत याबद्दलचे चिंतन 'पावसानंतरचे ऊन' या रमेश पानसे लिखित छोटेखानी पुस्तिकेत वाचायला मिळते. संस्कार, मूल्ये व धर्मातीतता यांचा शिक्षणाच्या संदर्भात डोळसपणे पुनर्विचार का व कसा करावा याबद्दल ते आपले विचार सूत्रबद्ध रीतीने मांडतात.

संस्कारांनी प्रत्येक मुलांच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध घेण्याच्या शैक्षणिक प्रक्रियेला साहाय्य करावे, सामाजिक संबंध हितकारक होण्याच्या दृष्टीने सामाजिक वागणुकीचे नीतिनियम या दृष्टीने ते संस्कारांचा अर्थ स्पष्ट करतात. संस्कारांचा संबंध बालकांच्या भावी काळाशी असल्याने त्यामध्ये निसर्ग-मानव संबंधांची दिशाही ते दर्शवितात. माणसांची हरवत चाललेली संवेदना संस्कारातून परत यावी हा विचारही ते मांडतात. नैतिक विचार आणि व्यवहार यांचा विचार समाजधारणेसाठी कसा असावा याबाबत ऐतिहासिक आढावा व समाजशास्त्रीय विश्लेषण करतात. शिक्षणक्षेत्रात व्यावहारिक नीतीचा विधायक दृष्टिकोनातून मूल कसा स्वीकार करेल ते स्पष्ट करतात. धर्मकल्पनेच्या पलीकडे जाणारी विवेकशक्ती, विचारस्वातंत्र्याचे महत्त्व व यांचा शालेय उपक्रमाशी असलेला समवाय ते स्पष्ट करतात.

रमेश पानसे यांची भाषा संवादरूपी, सोपी पण विचारप्रवर्तक आहे. पुस्तिकेचे शीर्षक बोलके असून मुखपृष्ठाची प्रतीकात्मक सजावट विषयानुरूप आहे. या पुस्तिकेतील विचार अधिकाधिक लोकांपर्यंत पोहोचले तर धर्मातीत समाजाच्या संस्थापनेसाठी आपण प्रयत्न करू शकू. ■



अनुक्रमणिका

# इंग्लिश विंग्लिश...

गिरीश कुबेर

गेल्या आठवड्यात 'लोकसत्ता'च्या 'व्हिवा लाऊंज'मध्ये गौरी शिंदे आली होती. 'इंग्लिश विंग्लिश'ची दिग्दर्शिका. खूप मुली, महिला जमल्या होत्या तिच्याशी गप्पा मारायला. नोकरी करणाऱ्याही खूप जणी होत्या. सगळ्यांच्या आठवणींचा एकच समान धागा. इंग्रजी नीट येत नसल्यानं आपली झालेली त्रेधातिरपीट आणि साहेबाच्या भाषेवर हुकमत नसल्यानं आपण कसं मागे पडलो आणि पुढे येण्यासाठी किती संघर्ष करावा लागला वगैरे. ते ऐकलं आणि 'न्यूयॉर्क टाइम्स'मध्ये अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या एका बातमीची आठवण झाली.

हार्वर्ड विद्यापीठाचे माजी अध्यक्ष लॉरेन्स समर्स यांची ती मुलाखत होती. समर्स यांचं नाव विद्यापीठ व्यवस्थापन क्षेत्रात आदरानं घेतलं जातं. गृहस्थ व्यासंगी. अमेरिकेचे माजी अध्यक्ष बिल क्लिंटन यांचे ते वित्तमंत्री होते. जागतिक बँकेचे ते मुख्य अर्थतज्ज्ञ होते आणि बराक ओबामा यांच्या अध्यक्षपदाच्या पहिल्या टप्प्यात ते अमेरिकेच्या राष्ट्रीय अर्थशास्त्र परिषदेचे अध्यक्ष होते. तेव्हा बाकी कशापेक्षाही अर्थशास्त्र त्यांच्या रक्तात मुरलेलं. साहजिकच जगाकडे अर्थशास्त्राच्या चष्म्यातूनच बघायची सवय. तर त्यांनी त्या मुलाखतीत समस्त विद्यापीठांना सूचना केली होती. काय? तर तुमच्या तुमच्या विद्यापीठांत परदेशी भाषेचे जे जे विभाग असतील ते सगळेच्या सगळे बंद करा आणि पैसे वाचवा.

**पण ते पैसे वाचवून करा काय?**

तर इंग्रजी भाषेचा विभाग अधिक सक्षम करा.

या समर्स यांचं म्हणणं असं की... काय करायचंय परदेशी भाषा शिकून... जगात सगळे जण आता मोठ्या प्रमाणावर इंग्रजीच शिकू लागलेत... इंग्रजीचा टक्का चांगलाच वाढतोय. जागतिकीकरणाच्या रेट्यात अधिकाधिक देश इंग्रजी शिकू लागलेत. अमेरिकेच्या एखाद्या कंपनीच्या प्रमुखाला भारतात जाऊन व्यवसाय करायचाय, डॉक्टरला आफ्रिकेत रुग्णालय सुरू करायचं आहे... तर त्यासाठी हवं आहे ते इंग्रजीचं ज्ञान. दावोस या स्वित्झर्लंडमधल्या आल्प्सच्या कुशीतल्या शहरात दर वर्षी जागतिक आर्थिक संघटनेची मोठी परिषद भरते. त्या ठिकाणी जमणारे राष्ट्राराष्ट्रांचे प्रमुख, पत्रकार, अभ्यासक वगैरे सगळे एकाच भाषेत बोलतात, ती म्हणजे इंग्रजी. अशा वेळी या परदेशी भाषा वगैरे शिकण्यात काहीही अर्थ नाही... फक्त इंग्रजी शिका. प्रगतीसाठी तेवढंच पुरे आहे.

**म्हणजे तिकडेही तेच**

समर्स हे जे काही सांगत होते, ते तिथे अलीकडच्या काळात दिसू लागलं आहे. अल्बानी विद्यापीठानं काटकसरीचा भाग म्हणून आपल्याकडचा अन्य भाषा विभाग बंद केलाय. चांगलं श्रीमंत म्हणून ओळखल्या जाणाऱ्या साऊथ कॅलिफोर्निया विद्यापीठानं २००८ साली जर्मन भाषा विभाग बंद केला. जगातली ११व्या क्रमांकाची, जगातल्या चौथ्या क्रमांकाची अर्थव्यवस्था. बाकी काही विभागांनी वेगवेगळ्या भाषा विभागांना परदेशी भाषा केंद्र असं म्हणत एकाच छत्रीखाली आणलंय. इतर काहींनी त्याच दिशेनं तयारी सुरू केलीय.

**कोणत्या भाषा विभागांना या मंडळींनी कात्री लावली?**

फ्रेंच, इटालियन, रशियन आणि प्राचीन भाषा, म्हणजे लॅटिन वगैरे.

समर्स यांच्या मतावर अमेरिकेत भाषातज्ज्ञ, समाजाभ्यासक यांनी टीकेची झोड उठवलेली आहे. त्याचा वेध घेणं आपल्यासारख्या धेडगुजरी भाषकांच्या देशात सयुक्तिक ठरेल. अनेकांनी समर्स यांच्या मताचा इतका शास्त्रशुद्ध प्रतिवाद केलाय. त्यांचं म्हणणं की, जगात भाषेचं वैविध्य असायलाच हवं. ज्या ज्या देशांवर इंग्रजांचं राज्य नव्हतं, त्या त्या देशांत इंग्रजीचा प्रभाव वाढता असला तरी ती त्या त्या देशांत दुसरी भाषा म्हणूनच आहे. भारतात गेल्या वर्षी तब्बल २३ भाषांत १२७४ सिनेमे बनवले गेले. त्यातले २१५ हिंदीत होते, २०२ तामिळ, १८१ तेलुगु, १४३ कन्नड आणि ११६ मराठी. या चित्रपटांचं... म्हणजे ते बनवणाऱ्यांचं आणि पाहणाऱ्यांचं... इंग्रजीशिवाय काहीही अडलं नाही. आपल्यासारखाच मोठा सांस्कृतिक वारसा असणाऱ्या टर्कीमध्ये आज प्रचंड प्रमाणावर फ्रेंच शिकलं आणि शिकवलं जातं. ते काही ऑटोमन साम्राज्यावर फ्रेंचचा प्रभाव होता म्हणून नव्हे, तर आधुनिक काळात व्यक्त व्हायला फ्रेंच ही खऱ्या अर्थानं तटस्थ भाषा आहे, असं तिथं अनेकांना वाटतं म्हणून. जगभरात अलायन्स फ्रांसेच्या शाखांत फ्रेंच शिकण्यासाठी तरुणांची संख्या वाढतीच आहे आणि खुद्द अमेरिकेत भाषेचा वाढता प्रभाव आहे तो स्पॅनिशचा. एक तर कोलंबसामुळे अमेरिकेत हिस्पॅनिक्सचं प्रमाण मोठंच आहे. त्यांचा मोठा दबाव गट त्या देशात आहे. इतका की, काही प्रांतांत सरकारी वैद्यक सेवेत काम करणाऱ्या डॉक्टराला एक वेळ इंग्रजी आलं नाही तरी चालेल; पण स्पॅनिश यावंच लागतं. आणि चीनचं काय? जगात इंटरनेटचा वापर करणाऱ्यांची संख्या भीती वाटावी इतक्या गतीनं वाढतीये. या माध्यमाची भाषा इंग्रजीच असते असं आपलं आपण मानतो. काही प्रमाणात ते खरंही आहे. गेल्या वर्षभरात इंटरनेटचा वापर इंग्रजीत करणाऱ्यांची संख्या ३०१ टक्क्यांनी वाढली. म्हणजे इंग्रजीचा वेग भलताच म्हणायला हवा. अन्य भाषांतून इंटरनेट वापरणारेही वाढले.

**किती टक्क्यांनी?**

चिनी भाषेत इंटरनेटच्या महाजालात मुशाफिरी करणाऱ्यांचं प्रमाण १४७८ टक्क्यांनी वाढलं. म्हणजे इंग्रजीचा प्रसार ३०१ टक्क्यांनी, तर चिनी भाषेचा १४७८ टक्क्यांनी. आफ्रिकेच्या अनेक देशांत चिनी भाषक मोठ्या प्रमाणावर स्थलांतरित झाले आहेत. चीन सरकारच्या अधिकृत आकडेवारीनुसार जवळपास आठ लाख चिनी अनेक आफ्रिकी देशांत आहेत. त्या सर्वांसाठी आणि चिनी भाषेच्या प्रसारासाठी चीन सरकार आणि त्या देशातील खासगी कंपन्या कोट्यवधी डॉलर्सची गुंतवणूक करताना दिसतात.

एवढं लांब जायचंही कारण नाही. आपल्या हिमाचल प्रदेशात तुम्ही कधी गेलात तर एक अनुभव घेऊन पाहाच. तो म्हणजे तिथल्या सायबर कॅफेत जाऊन बघा... मेल वगैरे करायला. एक बाब तिथे दिसेल म्हणजे दिसेलच. ती म्हणजे तिथल्या संगणकाचे कळफलक इंग्रजी असणार नाहीत, तर ते असतील हिब्रूत. म्हणजे अगदी सिमला वगैरे परिसरातदेखील हे पाहता येईल. त्या परिसरात दर वर्षी मोठ्या प्रमाणावर इस्रायली तरुण पर्यटक येत असतात. त्या देशात लष्करी शिक्षण अत्यावश्यक आहे. ते झाल्यावर या पोराटोरांना भलीमोठी पगारी रजा मिळते. त्यामुळे आपापल्या मैत्रिणींना वगैरे घेऊन 'बं भोलेऽ' करण्यासाठी ही पोरं त्या राज्यात मोठ्या संख्येने येतात. सायबर कॅफेत त्यामुळे तुम्हाला संगणकाचा कळफलक इंग्रजी सापडणार नाही. सगळेच्या सगळे हिब्रूत. आता इस्रायल आकारानं देश केवढा? चालत गेलं तर काही दिवसांतच या टोकाकडून त्या टोकात तो संपवता येईल. पण तरीही त्या देशानं स्वतःचा असा हिब्रू कळफलक तयार केलाय.

आता आपल्याच उत्तरेकडच्या राज्यात जा. एक तरी राज्यात संगणकाचा कळफलक इंग्रजीत आहे का बघा. एकही सापडणार नाही. महाराष्ट्रातही असंच आहे. आपल्याकडे मराठीचेच इतके अवतार संगणकावर आहेत की त्यातून नवीनच गोंधळ सुरू झालाय. म्हणजे एका सॉफ्टवेअरमध्ये अमुक एका कळफलकात लिहिली गेलेली मराठी दुसऱ्याच्या संगणकात दिसतच नाही आणि 'मोडेन पण वाकणार नाही...' या मर्दमराठी बाण्यामुळे प्रत्येक सॉफ्टवेअर निर्मात्याला आपलीच संगणकीय मराठी आदर्श वाटते. असो. आपला भाषा गोंधळ हा काही या वेळचा विषय नाही.

तर मुद्दा अमेरिकेचा आहे. समर्स यांच्या या विधानाचा इतक्या मोठ्या प्रमाणावर अमेरिकेतच प्रतिवाद झालाय की विचारू नका. त्यातल्या एकानं हे सगळे भाषिक वैविध्याचे दाखले दिलेत... आणि विचारलंय, हे असं जर आहे, तर मग इंग्रजीची एवढी गरज का लागते?

हा प्रश्न त्यानं परदेशी भाषा शिकून अमेरिकेत आलेल्या एका तरुणाला विचारला. त्यानं सांगितलं... आम्हाला एकाच कारणासाठी एकच इंग्रजी हवीये-वॉल स्ट्रीट

इंग्लिश... म्हणजे पैसे कमवण्यासाठी, बस्स! इंग्रजीचा उपयोग तेवढाच... आम्ही आनंदासाठी आमच्या भाषेतच शिकतो, लिहितो-वाचतो. इंग्रजी आमची मुख्य भाषा होऊच शकत नाही. आमच्या भाषेत जेवढा आनंद मिळतो आम्हाला तो इंग्रजीत नाही मिळत. अगदी प्राचीन काळीही रोमन साम्राज्य ऐन भरात असताना, आर्थिक-राजकीय ताकदीनं तळपत असताना अनेक युरोपीय देशांनी आपापली भाषा हृदयाशी कवटाळून ठेवली होती.

त्याचं काय झालं पुढे? आज रोमन साम्राज्य कुठे आहे?

ते तर कधीच लयाला गेलं.

पण त्या भाषा टिकल्यात.

इतिहास बरंच काही सांगतो भविष्याविषयी.

कळायला हवं आपल्याला ते.

( 'लोकसत्ता', २४ ऑक्टोबर २०१२ )

■

**भाषांचं कडबोळं**

''अनाहिताची मात्र भाषेची थोडी पंचाईत झाली होती. अडीच वर्षांची झाली तरी अजूनही ती स्वत:च बनवलेल्या भाषेत बोलायची. हाताच्या डावल्या हलवत चिक्कार हातवारे करायची; पण तोंडातून शब्दांच्या जागी नुसते चालीतले उच्चार! 'इब्सिफिन्सीयाऽऽ सेस्निया' असं काहीतरी! ऐकताना, पाहताना गोड वाटायचं; पण कळायचं काहीच नाही. तिचा हा गोंधळ तिच्या पारशी डॉक्टरणीनं सोडवला. वेगवेगळ्या भाषांचं कडबोळं तिच्या डोक्यात झालं होतं. मी तिच्याशी मराठीत बोलायची. बापाईजी पारसी गुजरातीत. फरोख स्वच्छ इंग्लिशमध्ये, रवी-देवेन त्यांच्या बर्मिंगहॅमी-बोली-इंग्रजीमध्ये आणि रोझी आया गोव्याच्या कोकणी हिंदीमध्ये. सर्वांनी ठरवून एकाच भाषेत बोलणं आवश्यक आहे, असं डॉक्टरणीनं सांगितलं. इंग्रजी भाषा ठरली आणि तीन महिन्यात अनाहिता अस्खलित बोलू लागली.'' (पृ० २११)

''झिम्मा', विजया मेहता, राजहंस प्रकाशन, पुणे, २०१२, पृ० २११





अनुक्रमणिका

# बोली विशेषांक प्रकाशन-समारंभ

जयश्री काटीकर

'भाषा आणि जीवन'च्या दिवाळी २०१२ या बोली विशेषांकाच्या प्रकाशनाचा समारंभ वेदशास्त्रोत्तेजक सभागृहात १० नोव्हेंबर २०१२ला आयोजित करण्यात आला होता. पुणे विद्यापीठातील तत्त्वज्ञान विभागाचे प्रमुख, डॉ० सदानंद मोरे यांनी या विशेषांकाचे प्रकाशन केले. संपादक या नात्याने डॉ० नीलिमा गुंडी यांनी मनोगत व्यक्त करताना विशेषांकामागील भूमिका स्पष्ट केली. महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरही मराठीच्या बोली आहेत. १९८०च्या सुमारास वाङ्मयीन स्थित्यंतर घडवणारा एक घटक म्हणूनही बोलींना महत्त्व आहे. भाषावैज्ञानिक वाङ्मयीन बोलींचा अभ्यास ऐतिहासिक, सांस्कृतिक आदी विविध दृष्टिकोनांतूनही व्हायला पाहिजे. 'बोली विशेषांक' हे या दृष्टीनं उचललेले पहिले पाऊल आहे, असं डॉ० गुंडी म्हणाल्या.

डॉ० सदानंद मोरे यांनी आपल्या भाषणात 'भाषा आणि जीवन'चे अभिनंदन केले. ते पुढे म्हणाले, ''भारत हा जसा खंडप्राय देश आहे, तसाच तो बोलींचाही देश आहे. त्यामुळे बोलींचा अभ्यास होणं ही महत्त्वाची गोष्ट आहे. प्रमाणभाषा आणि बोली भाषा हा केवळ तांत्रिक मुद्दा नाही, तर त्याला व्यावहारिक, सामाजिक, सांस्कृतिक परिमाणेही आहेत. प्रदेश, व्यवसाय, जाती-उपजाती यांच्यातल्या भाषिक व्यवहाराची गुंतागुंत पकडणे हे भाषाभ्यासकाचं काम आहे. अभिजनांची भाषा आणि बहुजनांची भाषा यात आपल्या समाजात पहिल्यापासूनच दरी जाणवते. शिवाय भाषिक अस्मिता, भाषिक राजकारण हे शब्दही आपल्या परिचयाचे आहेत. पण निकोप समाजासाठी समाजातल्या सर्वच घटकांची भाषा संवादी असायला हवी. प्रमाण भाषा आणि बोली भाषा यांच्यातला दुवा सांधण्याचं काम या अंकाच्या निमित्ताने 'भाषा आणि जीवन'ने केलं आहे.''

आपल्या अध्यक्षीय समारोपात प्रा० प्र०ना० परांजपे यांनी प्रमाण आणि बोली यांच्या स्वरूपावर प्रकाश टाकला - तो असा : ''मराठी साहित्यात ग्रामीण-दलित प्रवाह आल्यावरच प्रमाण आणि बोली यातली तफावत जाणवू लागली. खरंतर प्रमाण आणि बोली एकमेकींच्या शत्रू नसतातच. पण शुद्धाशुद्ध विवेकासंदर्भात प्रश्न निर्माण होऊ शकतात. बोलींमध्येच अधिक प्रखर संपन्न अनुभव असतात. कारण ती जीवनाला भिडलेली असते. ही जाणीव भाषाभ्यासकांनीच करून द्यायची असते.

कार्यक्रमाचे प्रास्तविक कार्यवाह प्रा० आनंद काटीकर यांनी तर सूत्रसंचालन विजया चौधरी यांनी केले. ■

# स्वभाषा आणि आम्ही

गोविंद नारायण माडगांवकर

एक विद्वान् असे म्हणतो. अनेक भाषा शिकाव्या, आणि मनुष्यानें विद्वान् व्हावे ते कशासाठी? स्वभाषेंत अनके भाषांतील शब्द व कल्पना मिसळून तीस उत्तम प्रतीच्या भाषेची योग्यता आणावी, नाहींतर अनेक भाषा शिकून व विद्वान होऊन लोकांस तादृश लाभ होत नाही. एखाद्या मुलाचे आईबाप मुळचे दरिद्री असतात, व पुढें मुलगा कर्तृत्वी निघून व मोठी संपत्ति मिळवून जसा आपलें कूळ उदयास आणितो, त्याचप्रमाणें विद्वान लोकांचें कूळ ही त्यांची स्वभाषा, ही त्यांणीं उदयास आणिली नाहीं, तर मुलास संपत्ति प्राप्त झाली असतां त्याणें आपल्या आईबापांस घरांतून हाकून देऊन परक्यास आपल्या वैभवाचें सुख दिलें असतां त्याजवर कृतघ्नपणाचा जो दोष येतो, तोच त्यांसही लागू होतो. व्यास, वाल्मिक, पाणिनि, इत्यादि अमर झाले, ते एक स्वभाषा सुधारल्यावरूनच.

दुसरे - ज्ञानेश्वर, वामन, मुक्तेश्वर, तुकाराम, मोरोपंत, रामदास, मुकुंदराज, श्रीधर, सोपानदेव, एकनाथ, इत्यादि प्राकृत कवींनीं मनावर घेऊन पद्यरचनेंत हजारो ग्रंथ रचले, तेव्हांपासून मराठी भाषा थोडीसी उदयास आली, आणि ती भाषा कांहीं उपयोगी आहे असें लोक मानूं लागले व आर्या, श्लोक, अभंग, दिंड्या, ओव्या इत्यादि वाचण्याची लोकांस गोडी लागली. हे त्यांणीं श्रम केले नसते, तर मराठी भाषा केव्हांच विलयास गेली असती. गद्यरचनेंत शास्त्रीय विषयांवर ग्रंथ झाले नाहींत, यामुळें ती शास्त्री व पंडित जनांस मान्य झाली नाही.

तीनशें वर्षांमागें इंग्रजी भाषा म्हटली म्हणजे मुळची अगदीं पोरकट होती, आणि विद्वान इंग्रज लोकांस कांहीं लिहिणें किंवा भाषण करणें पडे, तेव्हां जसें आम्ही हल्लीं गणपतीच्या कथेच्या चिट्या, धर्मसंबंधी सभांचे कागद, भाजीची यादी, व लग्नपत्रें देखील इंग्रजींत पाठवितों, त्याच प्रमाणें ते सर्व अगत्याचा कागदपत्राचा व्यवहार लातीन किंवा फ्रेंच भाषेंत करीत. स्वभाषेची त्यांला इतकी लाज वाटे कीं, तीमध्यें ते चौघांत एकमेकांसीं भाषण करायास देखील लाजत, आणि हल्लीं आम्ही जसे अर्धी मराठी आणि अर्धी इंग्रजी बोलतो, तसे ते अर्धी इंग्रजी व अर्धी लातीन बोलत. परंतु पुढें जेव्हां बेकन्, न्यूटन्, मिलटन्, पोप्, शेक्स्पियर्, बैरन्, स्काट्, अडिसन्, इत्यादि त्यांमध्यें धुरंधर विद्वान् झाले, तेव्हां त्यांणीं ती भाषा श्रमेंकरून उदयास आणिली. आणि आतां ती सर्व मान्य झाली इतकेंच नाहीं, परंतु संस्कृत, लातीन, अरबी, हिब्रू इत्यादि विद्वज्जन भाषांच्या पंक्तीस जाऊन बसली. अहो? ही आम्हांस किती लांच्छन आणण्याजोगी गोष्ट आहे. इंग्लंड

देशांतील इंग्रज आचार्यांनीं आमच्या देशांत येऊन संस्कृत व प्राकृत भाषांचे कोश तयार करून आम्हांस द्यावे; आम्ही मराठींत लिहिलेले ग्रंथ त्यांनीं शोधावें; आमच्या वेदाचा अर्थ जर्मनी देशांतील भट्ट मोक्षमुलर यांणीं लावून व त्याजवर टीका करून छापून आम्हांसाठीं पाठवून द्यावा; आमच्या मराठी, संस्कृत आणि गुजराथी विद्यार्थ्यांची परीक्षा डाक्तर विल्सन्, डाक्तर मिचल्, मेजर क्यांडी इत्यादि इंग्रज पंडितांनीं घ्यावी; आणि मुंबईतील कालेजांत विद्यार्थ्यांस संस्कृत शिकवायास जर्मनी देशांतून गुरु यावा. अर्थात् हीं सर्व देशाभिमानाचीं व अप्रतिम उद्योगाचीं फळें आहेत, दुसरें कांहीं नाहीं.

जर कोणी म्हणेल कीं, आमच्या लोकांस एवढे दोष कां देतां. भारत, भागवत, रामायण, ज्योति:शास्त्र, न्यायशास्त्र, मानसशास्त्र, व्याकरण, वैद्यशास्त्र, अशा गहन विषयांवर मोठमोठे राजमान्य ग्रंथ आमच्या पूर्वजांनीं रचिले आहेत, तर आम्हांमध्यें काय सामर्थ्य नाहीं? आम्हांस ही गोष्ट कबूल करणें भाग आहे कीं, व्यास, वाल्मिक, गौतम, कालिदास, पाणिनि, यांसारखे आम्हांमध्यें महान् विद्वान् होऊन गेले खरें; परंतु तें ज्ञान त्यांजकडेसच राहिलें. तें आम्हांस उपयोगी पडत नाहीं. ज्याची विद्या, ज्याचें ऐश्वर्य, ज्याचें सत्कर्म, ज्याचें धैर्य, ज्याची शरीरसंपत्ति, ज्याचें सुख, त्याचें भूषण देतें. ज्ञान म्हटलें म्हणजे ज्याचें त्यालाच. दूर कशास जावें? बापाचा लौकिक मुलास उपयोगी पडत नाही. मग शेंकडो वर्षांमागील आमच्या पूर्वजांचें ज्ञान आम्हांस कोठून भूषणदायक होईल? हीं सर्व श्रमेंकरून ज्याचीं त्याणेंच साध्य केलीं पाहिजेत, तेव्हांच त्या पुरुषास भूषण येईल. द्रव्य देखील स्वकष्टानें कमाविलें असतां जेवढें भूषण देतें, तेवढें वडिलांनी ठेविलेल्या द्रव्यापासून भूषण येत नाहीं.

यावरून अशी कल्पना निघत्ये कीं, आम्हांमध्यें पूर्वी मोठे विद्वान् होऊन गेले, त्यामुळेंच आम्हांला हल्लीं अभिमान उत्पन्न होऊन आम्ही आळशी होत चाललों. जर आम्हांमध्यें मुळीच कोणी विद्वान् झालेले नसते, तर कदाचित् आम्ही विद्येकडे झटून ती संपादन करायाचे उद्योग केले असते. इंग्रज लोकांमध्यें पूर्वी विद्वान् नव्हते व विद्या कलाही त्यांस माहीत नव्हत्या, म्हणूनच त्यांणीं देशोदेशीं जाऊन अनेक शोध केले, व लोकांचीं शास्त्रें तपासून त्यामध्यें जें जें उपयोगी होतें, तें साध्य करून घेतलें, आणि त्यांची वृद्धि केली. व त्याच उद्योगांत ते सुख मानितात.

[ 'मुंबईचें वर्णन' या गोविंद नारायण माडगांवकर यांच्या प्रस्तावनेचा संपादित अंश, पुन:प्रकाशन समन्वय प्रकाशन, कोल्हापूर, २०१२ मधून साभार. ]

(टीप : हे पुस्तक १८६३मध्ये प्रकाशित झाले असल्यामुळे नियमानुसार याचे लेखन मुळाबरहुकूम ठेवले आहे. - संपादक) ■





अनुक्रमणिका

# घोषयात्रा

माधव ना० आचार्य

संदर्भ - 'भाषा आणि जीवन'- (३०.३, पावसाळा २०१२ मधील प्रा० ब्रह्मानंद देशपांडे यांचा 'इशालू' हा लेख.

त्या लेखाचे निमित्त - माझ्या 'ध्वनितार्चे केर्णे (२००८) या संग्रहातील 'खेंचराचे या ही मना' या लेखात उद्‌धृत केलेली (ज्ञानदेवी - १३.५००) ही ओवी व तीमधील 'इसालु'चा मी नोंदलेला 'ब्रह्मराक्षस' हा अर्थ.

प्रा० देशपांडे यांचा निष्कर्ष - 'इसालु' म्हणजे ब्रह्मराक्षस नव्हे; तर, इर्षालू, सतत ईर्ष्या करणारा. त्यांनी दिलेला आधार - श्रीज्ञानेश्वरी - महाराष्ट्र शासन प्रत - शब्दकोश पृ० ६९४.

यावर माझे स्पष्टीकरण - उल्लेखित लेख आठ-नऊ वर्षांपूर्वी लिहिलेला आहे. त्यांत केवळ ज्ञानदेवीतील खेचर सृष्टीचा उल्लेख एकत्र करणे एवढाच हेतू होता. मात्र मी दिलेला ब्रह्मराक्षस हा अर्थ माझ्या मनीचा नाही. माझ्यासमोर त्या वेळी (आज असते तशीच) ज्ञानदेवीची 'मंगरूळकर-केळकर संपादित, मुंबई विद्यापीठ प्रत' होती. तीमध्ये हाच अर्थ दिला आहे. तोच मीही दिला. या संपादकांच्या पूर्वीच्या कुंटे, भिडे व दांडेकर या संपादकांनीही प्रस्तुत ठिकाणी ब्रह्मराक्षस, ब्रह्मसमंध, भूत, पिशाच - असेच अर्थ दिले आहेत. (दांडेकरांनी 'सर्प' असा पर्यायी अर्थही दिला आहे. त्यांच्या पूर्वीच्या साखरे संपादित प्रतीतही 'सर्प' हाच अर्थ आहे. स्वामी स्वरूपानंदांच्या 'अभंग ज्ञानेश्वरी'तही याच अर्थाचे अनुसरण आहे. या अर्थाचा विचार पुढे यथास्थल करू.)

खरे म्हणजे, माझे स्पष्टीकरण येथे संपते; परंतु थोडा नव्याने विचार करतो.

हा विचार करताना, 'साहित्यदर्पण'कार विश्वनाथाचे एक वचन आठवते, ते असे- 'अन्यद्‌हि शब्दानां व्युत्पत्तिनिमित्तं, अन्यत्‌च प्रवृत्तिनिमित्तम्!' शब्दांचे व्युत्पत्तिप्राप्त अर्थ वेगळे, प्रवृत्तिरूढ अर्थ वेगळे. मात्र हा प्रवास जसा व्युत्पत्तीकडून प्रवृत्तीकडे तसाच काही वेळा एका प्रवृत्तीकडून दुसरीकडे व क्वचित प्रवृत्तीकडून नव्या व्युत्पत्तीकडेही जातो. शब्दगंगा सुलटी वाहते, विविध प्रवाही होते; क्वचित उलटीही वाहते. या सर्व अर्थअर्थांतरांतील संबंध काही वेळा बादरायण स्वरूपाचाही असतो. या नातेसंबंधात जसा कार्यकारणभाव तसाच औपम्यसंबंधही असतो. 'गंगायां घोष:'प्रमाणे या शब्दगंगेच्या किनारी असणाऱ्या गौळीवाड्याची एक घोषयात्रा आता करू या.

प्रा० देशपांडे यांनी उद्‌धृत केलेली दृष्टान्तपाठातील कथा प्रथम पाहू. माझ्यासमोर आत्ता कोलते संपादित 'लीळाचरित्रा'बरोबरच दृष्टान्त पाठाच्या दोन प्रती आहेत. एक - तुळपुळे-घारपुरे संपादित व दुसरी - रा०शं० नगरकर यांनी संपादित केलेली. या दोन्ही प्रतीत उक्त कथा क्र० ५९ची आहे. दोन्ही ठिकाणी मूळ सूत्राचा पाठ 'विशाळुवाचे विशाळू' असा आहे.

तुळपुळे-घारपुरे प्रतीत 'विशाळु' म्हणजे 'स्वस्त्रीवर अत्यंत कडक नजर ठेवणारा' असा अर्थ टिपांमध्ये दिलेला आहे. श्री० नगरकर 'इसाळु-विशाळु' हा शब्द 'विषयालु'-पासून व्युत्पादितात व त्याचा 'विषयासक्त' असा अर्थ देतात. उक्त कथेतील स्त्रीचा पती तिच्यावर सख्त नजर ठेवतो. का? संशयी असतो म्हणून, की विषयासक्तीमुळे? नगरकर म्हणतात, तो विषयासक्त असल्यामुळेच स्त्रीपरायण बनतो व आपल्या स्त्रीची दृष्टी आपल्याशिवाय अन्य कुणाकडे वळू नये म्हणून तो तिच्यावर कडक नजर ठेवतो.

म्हणजे येथे प्रवृत्ती-प्रवृत्ती व नंतर व्युत्पत्ती असा प्रवास आहे. मात्र या अर्थासंबंधात एक गोष्ट नोंदवतो.

'ज्ञानेश्वरी'ची धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेने प्रकाशित केलेली मूळ राजवाडे प्रत दोन खंडांमध्ये १९०८ व १९०९मध्ये प्रसिद्ध झालेली आहे. दुसऱ्या खंडाच्या अखेरीस जोडलेल्या शब्दकोशामध्ये, इसालु=ईर्ष्यालु, कामुक असे अर्थ दिलेले आहेत. यांतील दुसरा नगरकरांच्या उपरोक्त 'विषयासक्त' या अर्थाला पाठिंबा देणारा आहे.

दृष्टांतपाठामध्येच क्र० ८२चा 'दुसरे या इसाळु वाचा दृष्टांत' आहे. येथेही स्वस्त्रीवर कडक नजर ठेवणाराच पती आहे. (नगरकरमते विषयासक्त पती आहे.) मात्र येथील स्त्री पतीशी भांडणारी आहे. तिचे वागणेही थोडे मोकळेच आहे. ती आपल्या वडिलांच्या वा भावाच्या मांडीवरही लोळते. त्यामुळे तो पती खंतावतो; पण तिला काही बोलत नाही. पण हीच गोष्ट अन्य कुणाच्या बाबतीत घडती तर? त्याने तिचा वधच केला असता.

लीळाचरित्रात 'इस़ाळु करणे' या शब्दप्रयोगाचा आणखी एक लक्षणीय उल्लेख मिळतो. इंद्रभटांची पत्नी गौराइसा ही एकदा रात्री चक्रधरांच्या पूजेच्या वेळी तेथे आली होती. तिला तेथेच झोप लागली. मग तिला चक्रधरांनी घरी पोहोचविण्याची व्यवस्था केली. पण इंद्रभट तिच्यावर रागावले. ('चिमोरे घेती : इस़ाळु केला.') त्यांनी सरळ तिचे चिमटे काढले व 'इसाळ केला.' म्हणजे काय केले? तिचा बहुतेक संशय घेतला. कारण त्यावरून दुसऱ्या दिवशी सकाळी स्वतः चक्रधर इंद्रभटांना म्हणतात, 'शं गा इंद्रेया. मुक्तीची चाड आणि खुंटदावे सांभाळणें.' हे ऐकल्यावर गौराइसेला वाटले, 'गोसावीं माझा कैवारु केला.' इंद्रभटांना मात्र जाणवले, 'गोसावीं माझें अनुचीत सांडवीलें.' ('लीळाचरित्र', पूर्वार्ध ३९८)

-आता या वळणावर 'इसाळ/ळे करणे' या वाक्‌प्रयोगाकडे जाण्यास हरकत नाही.





अनुक्रमणिका

परंतु तत्पूर्वी 'यथास्थल विचार करू' म्हणून सोडून दिलेला 'सर्प' धरायला हवा. ज्ञानदेवीच्या उक्त प्रतीतील १३-५०० ही चर्चास्पद ओवी साखरे प्रतीत ५०२वर व दांडेकर प्रतीत ५०१वर आहे. (पाठभेद दुर्लक्षणीय).

साखरे यांनी प्रस्तुत ठिकाणी, 'सर्प जसा बीळ सोडीत नाही...' असा अर्थ केला आहे. दांडेकर, 'ब्रह्मराक्षस अथवा अस्सल सर्प जसा (आपले धन असलेल्या) घराला विसरत नाही...' असा अर्थ देतात. स्वरूपानंद लिहितात, 'द्रव्यराशीवर वेटाळें करीन। राहतो बैसोन। सर्प जैसा' ('अभंग ज्ञानेश्वरी' - १३.८३०) - सर्प आपले बीळ वा भूमिगत धन कधीही सोडत नाही, ही कल्पना बहुतेक लोककथांमध्ये भेटते. (उदाहरणच हवे असेल तर पंचतंत्राच्या 'काकोलुकीय' या प्रकरणातील क्र० ५ व १० या कथांचा उल्लेख करता येईल. त्या देऊन उगीच जागा अडवीत नाही.)

'इसालु'चे संस्कृत पूर्वरूप म्हणून 'ईर्ष्यालु'चा उल्लेख सर्वच जण करतात. (उदा० राजवाडे, मोल्सवर्थ, दाते-कर्वे, तुळपुळे-ॲनी यांचे कोश.)

संस्कृत कोशकर्ते ईर्ष्य। ईर्क्ष्य् (१ प०) असा मूळ धातू देतात. त्यांनी दिलेल्या या धातूच्या अर्थांमध्ये पुढील अर्थच्छटा मिळतात - हेवा करणे, मत्सर करणे, दुसऱ्याचे यश पाहवत नसल्यामुळे त्याच्याशी स्पर्धा करणे. (थोडक्यात 'दुसऱ्यावर जळणे' वा त्याचे भले पाहवत नसल्यामुळे 'पोटात दुखणे.')

या धातूपासून ईर्ष्या, ईर्ष्युः, ईर्ष्यालुः असे साधित शब्द तयार होतात.

पूर्वोक्त मराठी कोशांपैकी मोल्सवर्थच्या मराठी-इंग्रजी कोशात इसळ/ळी, इसाळ/ळी या शब्दांचा Emulation असा नेमका अर्थ दिला आहे. 'इसाळू'चा ' Emulous' असा अर्थ तेथे येतो.

दाते-कर्वे यांच्या महाराष्ट्र शब्दकोशात, 'स्पर्धा, स्पर्धेचे वारे, चुरस, चढाओढ, अहमहमिका, हेवा, खुमखुमी' असे अर्थ दिलेले आहेत.

मोल्सवर्थने 'इसळा इसळा शेजारी पिसळला' अशी म्हण उद्धृत केली आहे. दाते-कर्वे यांच्या वाक्संप्रदाय कोशात ती 'ईसळला' अशा पाठभेदाने संगृहित केलेली असून तिचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे केलेले आहे- 'शेजाऱ्यांमध्ये परस्परांबद्दल ईर्षा किंवा असूया उत्पन्न झाली म्हणजे त्यांचा बिघाड होणार हे निश्चित. मत्सरामुळे शेजारी आपले शत्रू बनतात.'

'इसालें करणें' हा वाक्प्रयोग ज्ञानदेवीत पुढीलप्रमाणे आला आहे -

पद्मदलेंसिं इसालें। भांडताति हे डोले।
ते होतील पडवलें। पीकलीं तैसीं॥ (ज्ञा० १३.५५८)

मंगरूळकर-केळकरांनी येथे 'इसालें करणे'चा अर्थ 'स्पर्धा करणे' असाच केला आहे. ज्ञानदेवीच्या सर्वच संपादकांनीही असाच अर्थ केला आहे.

हा प्रयोग नामदेव व मुक्तेश्वर यांच्या काव्यरचनांमध्येही भेटतो. नामदेव एका अभंगात म्हणतात, 'ज्ञानदेवांनी योगमार्ग साधूनही भक्तिमार्ग आचरला.' हा योगमार्ग साधताना त्यांनी 'इसिसी जिंकिलें' (म्हणजे अहंगंडयुक्त देहभाव जिंकला.) अर्थात हा मार्ग सोपा नाही. म्हणून नामदेव सांगतात, 'याचिया इशाळे करीत जो मूर्ख। पावोनियां दुःख कष्टी होय॥' म्हणून ते शेवटी म्हणतात, 'योगमार्गाची ही सर्व खटपट सोडून पांडुरंग घ्यावा.' (नामदेव-शासकीय गाथा - क्र० २०४२)

मुक्तेश्वरी महाभारताच्या आदिपर्वात 'इसाळे' या शब्दाचा प्रयोग दोन-तीन ठिकाणी आला आहे. (पहा - १.१२९, २३.९३, ३१.५४- प्रियोळकर संपादित प्रत) प्रियोळकरांनी पैज, हेवा, स्पर्धा, खुमखुमी असेच अर्थ दिले आहेत.

'स्पर्धा करणे' हे योग्य की अयोग्य? आपण 'निरोगी स्पर्धा' असा शब्दप्रयोग मुद्दाम करतो. याचा अर्थ असा की, केवळ स्पर्धेमागे मत्सर, हेवा अशा प्रकारच्या अयोग्य वृत्तींची सूचना आहे.

- या वळणावर पुन्हा 'ईर्ष्या' या मूळ संस्कृत शब्दाकडे जाऊ या.

अथर्ववेदामध्ये ईर्ष्याविनाशन सूक्त आहे. (६.१८) त्यामध्ये ईर्ष्या ही एक हृदयव्याधी मानलेली आहे. तेथे ईर्ष्यायुक्त पुरुषाचे मन स्वैर धावते, असा उल्लेख येतो.

(अथर्व ७.४५) या सूक्तामध्ये ईर्ष्या ही अग्निसदृश दाहक क्रोधव्याधी मानली आहे.

(अथर्व ७.७४) हे सूक्त गंडमाला या रोगाचे निवारण करते. त्यांतील मंत्रांना जोडून आलेला पुढील मंत्र लक्षणीय आहे - एक प्रेयसी आपल्या प्रियकराला म्हणते, ''हे वल्लभा, वाङ्क मंत्राने तुझी ईर्ष्या मी नष्ट करते. त्यायोगे तुझा माझ्याविषयीचा क्रोध नष्ट होवो.'' (७०७४.३ चे चित्रावांनी केलेले भाषांतर.)

-अथर्ववेदातील असा हा प्रियकर दृष्टांतपाठातील 'इसाळू'चा पूर्वज दिसतो.

इत्यर्थ इतकाच की, ईर्ष्या हा एक मानसिक रोग आहे. महाभारतात एके ठिकाणी एतत् समान उल्लेख येतो. उद्योगपर्वातील विदुरनीतीमध्ये विदुर धृतराष्ट्राला म्हणतो, ''ईर्ष्या घृणी न संतुष्टः क्रोधनो नित्यशंकितः । परभाग्योपजीवी च षडेते नित्यदुःखिताः ॥ ('उद्योग', ३३.९०, गीता प्रेस प्रत)

हाच श्लोक हितोपदेशातील एका कथेत यथास्थल उद्धृत केलेला मिळतो. (हितोपदेश - मित्रलाभ - १.२५) हितोपदेशाच्या इंग्रजी आवृत्तीचे (१९२४) संपादक - प्रा० एम०आर० काळे यांनी प्रस्तुत श्लोकावरील स्वकृत व्याख्येत 'ईर्ष्या परोत्कर्षासहिष्णुः (पर+उत्कर्ष+असहिष्णुः) व घृणी जुगुप्सनशीलः' असे अर्थ दिले आहेत. हे सर्व नित्य दुःखच भोगतात. हाच मूळचा विदुराचा अभिप्राय येथेही लागू पडतो.

तेव्हा ईर्ष्या ही एक प्रकारची व्याधी असल्यामुळे शेवटी दुःखदायकच ठरते.

या व्याधीने ग्रासलेला पुरुष मरणोत्तर ब्रह्मराक्षस होतो, अशीही समजूत रूढ आहे. जेव्हा तिचा थोडा शोध घेऊया.

स्मृतिकारांच्या मते परस्त्रीघातक, परद्रव्यापहारी, परस्त्रीशी संबंध ठेवणारा पुरुष मरणोत्तर ब्रह्मराक्षस या योनीमध्ये जातो. (याज्ञवल्क्य ३.२१२, मनु० १२.६०) वामनपुराण सांगते, 'ब्राह्मण, गुरू, मातापिता व वृद्ध माणसे यांचा द्वेष करणारा वा त्यांचा अपमान करणारा, त्याचप्रमाणे रजस्वलेशी संबंध ठेवणारा पापी पुरुष ब्रह्मराक्षस होतो.' (वामन० ४०.३५ ते ३७ नाग पब्लिशर्स, दिल्ली.)

-या सर्वांहूनही रामायणातील उल्लेख आपल्या शोधात अधिक उपयोगी पडणारा आहे. पुत्रप्राप्तीसाठी यज्ञ करणाऱ्या दशरथाने आपल्या अमात्यांना यज्ञाची पूर्वतयारी यथाविधी करण्याची सूचना केली. त्या वेळी तो सांगतो, 'ह्या श्रेष्ठ यज्ञाच्या अनुष्ठानामध्ये जर कोणताही प्रमाद झाला नाही, तरच तो शेवटास जाईल. कारण विद्वान ब्रह्मराक्षस या यज्ञामध्ये कोठे न्यून पडेल ते पाहतात व यज्ञानुष्ठान अविधी झाले तर कर्त्याचा नाश होतो.' (वाल्मीकिरामायण - बालकांड - ८.१७-१८) येथे सूचित होणारे छिद्रान्वेषी ब्राह्मणाचे गर्वोद्धत पांडित्य लक्षणीय आहे.

या संदर्भात वामनपंडितांसंबंधीची (इ० स० १६०७ ते १६९५) पुढील आख्यायिका लक्षात घेऊ. हे पंडितकवी अनेक वेदान्तपर प्रकरणे व यथार्थदीपिका ही गीतेवरील टीका यामुळे प्रसिद्ध आहेत. परंतु त्याहूनही अधिक ते श्रीकृष्णचरित्रपर आख्यानकाव्यांमुळे रसिकमान्य आहेत. या भक्तिरचनांकडे ते का वळले? आख्यायिका सांगते, 'वामनपंडित हे काशीक्षेत्री राहून वेदविद्यासंपन्न झाले. परंतु त्यामुळे त्यांना गर्व झाला. विद्यामदामुळे गर्विष्ठ होऊन अनेकांशी वादविवाद करून, त्यांच्याकडून जयपत्रे घेत ते गावोगावी हिंडू लागले. एकदा त्यांचा मुक्काम एका पिंपळाखाली होता. त्या पिंपळावर काही ब्रह्मराक्षस राहत होते. तेथे एक नवीन ब्रह्मराक्षस आला व एका फांदीवर बसू लागला. तेव्हा आधी स्थानापन्न झालेल्या ब्रह्मराक्षसांनी त्याला अडविले. ते म्हणाले, ''ही जागा वामनपंडितांसाठी राखून ठेवली आहे.'' हे ऐकून वामनपंडितांना जाणवले, की आपणही आपल्या विद्यामदामुळे ब्रह्मराक्षस होणार. त्यांना पश्चात्ताप झाला व ते भक्तिरचनांकडे वळले. (उद्धृत -संस्कृतिकोश - ८.५९२. सारांशरूपाने)

-तेव्हा ईर्ष्यालूवरून इशालू व ईर्ष्येमागील अहंकारामुळे ब्रह्मराक्षस अशी ही अर्थपरंपरा आहे. (या परंपरेला कुणी अनर्थपरंपरा म्हटले तरी चालेल. कारण येथील 'अ' सादृश्यसूचक घेता येतो. टीप पाहा.) दृष्टान्तपाठातील इसाळू कुठे ठेवायचा? त्याच्या वर्तनात 'संशयकल्लोळ' आहेच. परंतु आणखीही एक औपम्यसंबंध लक्षात येतो.

ब्रह्मराक्षस हा धरलेले झाड (स्थल वा व्यक्ती) सोडीत नाही. तसाच हा इसाळू उग्रकठोर दृष्टीने स्वस्त्रीवर कडक नजर ठेवून असतो.

---

आता या वळणावर आणखी एक गोष्ट नोंदवतो. ही गोष्ट माझ्या शालेय जीवनात संस्कृतचे शिक्षक असलेल्या माझ्या वडिलांनीच मला सांगितलेली आठवते. ही गोष्ट लिखित रूपात मला मिळालेली नाही; परंतु तीत येणारा श्लोक 'सुभाषित रत्नभांडागारात' (१९२९) 'समस्याख्यानम्' या प्रकरणात मिळतो.

गोष्ट थोडक्यात अशी - एका ब्राह्मणाने पत्नी, पुत्र व स्नुषा यांसह काशीयात्रेला जाताना एका गावातील पडक्या घरात वस्ती केली. ते घर होते एका ब्रह्मराक्षसाचे. त्याने या ब्राह्मणाल: घरात राहण्यास मनाई केली. परंतु रात्रीच्या वेळी अन्यत्र जाण्यास ब्राह्मणाने नकार दिला. शेवटी त्या ब्रह्मराक्षसाने एका समस्येची पूर्ती करण्याच्या अटीवर त्या ब्राह्मणास तेथे राहण्याची परवानगी दिली. त्यासाठी ब्रह्मराक्षसाने पुढील चार सूत्रे देऊन त्यावर चार ओळींचा श्लोक पूर्ण करण्यास सांगितले. ती सूत्रे अशी - 'सर्वस्य व्दे', 'एको गोत्रे', 'वृद्धो यूना' व 'स्त्रीपुंवत्'. (ही पाणिनीय व्याकरणातील सूत्रे असल्याचा उल्लेख भांडागारातील श्लोकाच्या पादटीपांमध्ये केलेला आहे.) ब्राह्मणाप्रमाणेच त्याची पत्नी, पुत्र व स्नुषा हीदेखील संस्कृतज्ञ होती. त्यामुळे चौघांनी मिळून तो चार ओळींचा श्लोक पुरा केला. श्लोक असा -

सर्वस्व व्दे सुमतिकुमती संपदापत्तिहेतू।<br>
एको गोत्रे प्रभवति पुत्रान् यः कुटुम्बं बिभर्ति।।<br>
वृद्धो यूना सह परिचयात् त्यज्यते कामिनीभिः।<br>
स्त्रीपुंवत् च प्रभवति यदा तद्हि गेहं विनष्टम्।। (सुभाषित १८९.४७)

(भावार्थ - ''सर्वांजवळच असते दुहेरी वृत्ती - सुमती व कुमती. एक नेते संपन्नतेकडे तर दुसरी संकटांकडे. कुटुंबाचे भरणपोषण करणारा एक पुरुष त्या कुळामध्ये प्रभावशाली ठरतो. तरुणाशी मैत्री जडली की कामिनी स्त्रिया वृद्धाला सोडून जातात. स्त्री जर पुरुषाशी बरोबरी करू लागली तर ते घर नष्ट होते.'' (ही शेवटची ओळ स्त्रीवादी समीक्षकांनी वाचू नये.)

- अशी ही गोष्ट केवळ समस्यापूर्तीसाठीही तयार केलेली असेल. परंतु तीमधील ब्रह्मराक्षस महत्त्वाचा आहे. समस्यापूर्ती झाल्याबरोबर तो भूतयोनीतून मुक्त झाला.

- असा हा ब्रह्मराक्षस. तसाच तो इसाळूही धरले झाड सोडीत नाही. म्हणूनच चक्रधरांनी त्याचा सादृश्यार्थ उल्लेख केला. या संदर्भात आणखी एक लीळा पाहू. 'अज्ञातलीळा' क्र० ३८ची ती लीळा अशी - 'सर्वज्ञें म्हणीतलें हे शास्त्र आवृत्ती तया आवृत्ते : एरव्हीं मा म्हणौनि तोंडींहुनि जाए : हें इसाळुवांचें इसाळु.''

(आवृत्ती = पुनःपुन्हा म्हणणे. मा = मग)

चक्रधरांचे शास्त्र जसे म्हणणाऱ्याला सोडीत नाही; तसेच स्वत: चक्रधरही शिष्यांना सोडीत नाहीत. ते म्हाईंभटांना सांगतात, 'अयोग्यातें योग्य करीती : योग्यासी परमेश्वरू

ज्ञान देती : कव्हणां कव्हणी व्येसनुः कव्हणां कव्हणी व्येसनु : एथ जीव उद्धरी जेति हेचि व्येसनु : एथचें व्यसन जेयाचेनि प्रतिबंधे तेयालागि इं इशाळुवाचें इशाळु.') ('लीळाचरित्र' उत्तरार्ध १३४)

येथे आपली घोषयात्रा पूर्ण करण्यास हरकत नाही; कारण, ईर्ष्यालुः - इसाळु- ब्रह्मराक्षस-उग्रकठोर रक्षक - या अर्थ (वा अनर्थ) परंपरेने ही यात्रा सफल संपूर्ण होते.

**टीप :** 'अ' सादृश्यदर्शक कसा? कोशकारांनी 'अ' षडर्थक सांगितला आहे.
(१) अब्राह्मण : (ब्राह्मणसदृश), (२) अज्ञान : (ज्ञानाचा अभाव),
(३) अपट : (वस्त्राहून वेगळे), (४) अनुदरा : (कृशोदरी),
(५) अकार्य : (अप्रशस्त कार्य), (६) अनीति : (नीतिविरोध)
हे सहा अर्थ पुढील श्लोक अनुक्रमे असे -
तत्सादृश्यमभावश्च तदन्यत्वं पदस्पता। अप्राशस्त्यं विरोधश्च नञर्थाः षट् प्रकीर्तिताः।।

**मु०पो० चौल ता० अलिबाग, जि० रायगड,** 402203
स्थिरभाष: (02141)240362

■

**प्रतिसाद २**

## १. बोलीविशेषांकाविषयी

अंक मिळाला. अंक मुखपृष्ठासह अतिशय आवडला. बहिणाबाईंच्या कवितेसह औचित्यपूर्ण मुखपृष्ठ. आपले संपादकीय अभ्यासपूर्ण आहे. स्वतंत्र लेखच आहे हे संपादकीय. अंकातील काही लेख अजून वाचायचे आहेत. पृ० ३१ वरील 'खानदेश वैखरी : अहिराणी' हा लेख याआधी अजून दोन ठिकाणी वाचल्याचे आठवते. तेही पहिल्याच परिच्छेदातील चुकीच्या संदर्भासह. ज्ञानेश्वरांनीही अहिराणीत काही ओव्या लिहिल्या हे डॉ० पगारे यांनी म्हटले नसून त्याचा पूर्वस्रोत दुसरा कोणीतरी आहे.

**डॉ० सुधीर देवरे,** सटाणा (जि० नाशिक)
sudhirdeore2g@rediffmail.com

# भाषाविषयक लेखनसूची : २०१२

शशिकांत पवार

(टीप : ही सूची परिपूर्ण नाही याची आम्हांला जाणीव आहे. वाचकांनी आपल्या वाचनात आलेले संदर्भ कळवून ही सूची पूर्ण करण्यास हातभार लावावा, अशी विनंती आहे. - संपादक)

## (अ) नियतकालिकांतील लेख

**अ**मृते, संध्या - मराठी भाषा, संस्कृती आणि जागतिकीकरण - वसंत, फेब्रुवारी २०१२:८,९,१२,१३,१८ व १९

**कुं**भोजकर, वसंत - ''पाळण्यातील शब्द''- शब्ददर्वळ, दिवाळी २०१२:१२-१४

**कु**लकर्णी, सलील - मायबोलीचे प्रेम म्हणजे अन्य भाषांचा द्वेष नव्हे - अंतर्नाद, फेब्रुवारी २०१२:३१-३६

**गा**नू, मानसी - भाषा शिकणे : एक गंमत - चौफेर साक्षीदार, दिवाळी २०१२:२४१-२४६

**गुं**डी, नीलिमा - भारतीय भाषांचे भवितव्य - मसाप, एमेजू २०१२:४७-५०

**चा**सकर, भाऊसाहेब - शुद्ध व प्रमाणभाषेचे अतिरिक्त आग्रह घातक - अंतर्नाद, फेब्रुवारी २०१२:३७-४०

**जा**धव, पी०आर० - भाषाविज्ञान : अध्ययन अध्यापन : अक्षरवैदर्भी, फेब्रुवारी २०१२:६९-७२

**जो**शी, गिरीश - देशीभाषा ज्ञानभाषा म्हणून रुजल्याशिवाय समृद्ध होणे कठीण - अधिष्ठान, दिवाळी २०१२:१७८-१८१

**जो**शी, प्रसन्न - या चैनलवाल्यांची मराठी म्हणजे - मसाप, एमेजू २०१२:४०-४२

**ता**यडे, मनोज - देशीभाषा : प्रवास आणि भवितव्य - अक्षरगाथा, जुलै २०१२:१८-२१

**दा**मोदरे, स्वाती - मराठी व्याकरण व प्रमाणलेखन : स्थिती व समस्या - अक्षरगाथा, जुलै २०१२:३७-४१

**दे**शपांडे, नवनीत - वृत्तपत्रे आणि मराठी भाषा - मसाप, एमेजू २०१२:४३-४६

**दे**शमुख, शोभा - तेलुगु आणि मराठी भाषा : काही निरीक्षणे - आकंठ, दिवाळी २०१२:४९-५४

**न**रके, हरी - मराठीच्या अभिजाततेच्या शोधात - इत्यादी, (मनोविकास) दिवाळी २०१२:१९९-२०७

**पं**डित, माया - दलित, मातृभाषा, देशभाषा आणि इंग्रजी : जागतिकीकरणाचे नवे पेच - सृजन, दिवाळी २०१२:१४६-१५३

**प**ळवेकर, अशोक ना० - भाषा : साहित्य : संस्कृती आणि जागतिकीकरण - अक्षरवैदर्भी, दिवाळी २०१२:१६६-१६८

## ग्रंथ

## भाषा आणि जीवन (त्रैमासिक) : लेखनसूची : २०१२

**विजय पाध्ये**

(टीप : नोंदीचे सदरांतर्गत वर्गीकरण स्वतंत्ररीत्या दिले असल्यामुळे येथे सदरांचा उल्लेख केलेला नाही. - संपादक)

### लेखक

**आ**चार्य, मा०ना०/म्हणींचे दूर्वांकुर/२.३३

**आळ**वेकर, एकनाथ/कोल्हापुरी बोली/४.४३

**का**जरेकर, गोविंद/मालवणी बोलीचे मराठी साहित्यातील उपयोजन/४:९६

**काळ**बांडे, अनिल/बंजारा : बोली, संस्कृत आणि लोकसाहित्य/४:७१

**काळे**, कल्याण/बोलींचे स्वरूप/४.७

**काळे**, रावसाहेब/वऱ्हाडी बोलीतील स्वनिम/४.१५

**कि**रवले, कृष्णा/दलित ग्रामीण साहित्य शब्दकोशाच्या निमित्ताने/४.८९

**कु**लकर्णी, कल्पना/राजकारण्यांची भाषा/१.३७

**कोल्ह**टकर, माधवी/पुणे संस्कृत शब्दकोश : काल, आज आणि उद्या/३.१३

**खो**पकर, अरुण/दूरचे प्रतिध्वनी/१.५

**गुं**डी, नीलिमा/'भाषाच ही निकामी?'/३.७

**चां**गण, कोकिळा ह०/लोकसाहित्याने संपन्न लोकजीवन/१.३३

**जा**खडे, अरुण/भारतीय भाषांचे 'लोकसर्वेक्षण'/४.१०७

**ट**ण्णू, कीर्ती/संगणक : एक शैक्षणिक साधन/२.२८

**तु**पे, केशव/'बारोमास'चे भाषिक सामर्थ्य/४.८१

**दे**वधर, विद्या/भाषा हेच जीवन : द०पं० जोशी/२.६

**दे**वरे, सुधीर/बोली : काही समज, काही आक्षेप/४.९२

**दे**शपांडे, ब्रह्मानंद/शब्दायन : इशालू/३.५३

**प**वार, माधवी सुरेंद्र/पोतराजाची लोकगीते/१.४५

**पां**डे, भारती/ललित वाङ्मयाचा अनुवाद/१.२३

**पा**टकर, रमेशचंद्र/भाषा आणि व्यापार/१.२९

**पा**टील, शिवाजी विष्णू /ऐतिहासिक भाषाविज्ञान आणि मराठी भाषा/३.४३

**पा**ध्ये, विजय/भाषांतर-व्यवसायाच्या संधी आणि भवितव्य/१.१९

**पा**नसे, रमेश/ज्ञानरचनावादी भाषा-शिक्षणाचा प्रयोग/२.१२

**पा**नसे, रमेश/ वैचारिक कलाकृती/१.३१

**बा**गुल, फुला/खानदेशी वैखरी : अहिराणी /४.३१

**बा**पट, नीलकंठ/चिनी भाषा /३.३२

**मे**हता, कलिका/बोलींचे अभिलेखागार व संवर्धनकेंद्र/४.६५

**मो**डक, केतकी/भाषाविज्ञानाचे विस्तारणारे क्षितिज/२.२०

**मो**रे, नंदकुमार/चंदगडी बोली/४.४७

**संपादकीय**



**लेख**

## लेख



## परीक्षण

**परिषद-वार्ता**



**दखलयोग्य**



**धन आपलेच**



**रुचेची ना, पटेची ना!**



**शब्दजिज्ञासा**



**भाषा-वार्ता**

## प्रतिसाद



## ज्याची त्याची प्रचीती



## श्रद्धांजली



## पानपूरके



## अभिनंदन

## लेखक-परिचय



## ई-शब्दचर्चा



## स्वागत (अभिप्रायार्थ आलेली पुस्तके)



## वाचावे असे काही



## पुनर्भेट



## मुखपृष्ठ



## सूची

लेखक परिचय -

■ **काटीकर,** जयश्री आनंद : एम०ए० (मराठी), मॅकमिलन इंडियामध्ये १९९९ ते २००२पर्यंत उपसंपादक व २००२ ते २००४पर्यंत संपादक. ज्ञानप्रबोधिनीच्या छात्रप्रबोधन मासिकाच्या संपादनात काही वर्षे सहभाग.

टपाल-पत्ता : एफ 301, रिव्हर व्ह्यू रेसिडेन्सी, 12/1/1 वडगाव बुद्रुक, सनसिटी रस्ता, आनंदनगर, सिंहगड रस्त्यालगत, पुणे 411 051.

■ **कोलटकर,** (डॉ०) शीला, एम०ए०, (वाङ्मय), एम०ए० (शिक्षणशास्त्र), पीएच०डी० (शिक्षणशास्त्र); प्रशाला-शिक्षक म्हणून सेवानिवृत्ती. प्राथमिक शाळेपासून वरिष्ठ महाविद्यालयापर्यंतच्या विद्यार्थी-विद्यार्थिनींची शिक्षिका म्हणून २८ वर्षांचा अध्यापन-अनुभव. `आपणच' या.नियतकालिकाच्या सहसंपादक.

टपाल-पत्ता: 'उमा निवास', सुभाषनगर गल्ली क्र० 3, 1185 शुक्रवार पेठ, पुणे 411002,

स्थिरभाष: (020)2448 2520, चलभाष: 97663 75694,

ई-पत्ता: sheelakolatkar@gmail.com

■ **दादेगावकर,** (डॉ०) पद्माकर, हैदराबाद विद्यापीठाच्या सेंटर फॉर ॲप्लाईड लिंग्विस्टिक्स ॲंड ट्रान्सलेशन स्टडीजचे प्रमुख (आता निवृत्त), 'रसचर्चा', 'एका रात्रीचा प्रश्न' (अनुवादित) इत्यादी पुस्तके प्रसिद्ध.

टपाल-पत्ता: फ्लॅट क्र० 202/203, 2-2-1075/25, आर्चीज क्लासिक अपार्टमेंट, टिळकनगर क्रॉस रोड, अंबरपेठ, हैदराबाद (आंध्रप्रदेश) 500 013

स्थिरभाष: (040)6588 7884, चलभाष: 098492 65334.

ई-पत्ता: dadegaonkar@gmail.com

■ **पाध्ये,** विजय : पुण्यातील तीन उद्योगसमूहांमध्ये विविध उच्च पदांवर ३२ वर्षे नोकरी. १९९८पासून विविध उद्योग समूहांच्या गृहपत्रिकांचे संपादन. अभियांत्रिकी, मानव संसाधन, औद्योगिक संबंध, विकृतिशास्त्र, दूरसंचार इ० क्षेत्रांतील दस्तऐवजांचे अनुवादाचे काम करण्याचा व्यवसाय .

टपाल पत्ता : 4 चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037

स्थिरभाष : (020) 2441 1951, चलभाष : 098220 31963

ई-पत्ता : v.wordsmith@gmail.com





अनुक्रमणिका

■ **पानसे,** रमेश : अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक. ठाणे जिल्ह्यातील आदिवासी भागात विकास व शिक्षणविषयक प्रयोग. अर्थशास्त्र, समाजकार्य व शिक्षण या विषयांत ग्रंथलेखन. २५पेक्षा अधिक स्वतंत्र व संपादित पुस्तके. 'शिक्षणवेध' मसिकाचे संपादक. 'बाल-शिक्षण संशोधन व विकासकेंद्राचे संचालक. सामाजिक कार्यासाठी अनेक पुरस्कारांनी सन्मानित. महत्त्वाचे ग्रंथ - 'शिक्षण आनंदक्षण', 'कर्ता-करविता : आधुनिक मेंदुसंशोधन व आपले जीवन', 'शिक्षण : सामाजिक परिवर्तनाची चळवळ', 'नयी तालीम : गांधीप्रणित शिक्षणविषयक प्रयोगांचा इतिहास', 'रचनावादी शिक्षण' इ०
टपाल पत्ता : 314, गंगापुरी, वाई, जि० सातारा 412 803.
चलभाष : 098812 30869. ई-पत्ता : pritiupaddhye@gmail.com

■ **बोरकर,** (डॉ०) हरिश्चंद्र : झाडीबोलीचे अभ्यासक व कार्यकर्ते. 'झाडीबोली : भाषा आणि साहित्य' (१९८८) ह्या ग्रंथाला महाबँक भाषाविषयक लेखन-पुरस्कार.
टपाल-पत्ता: रेंगेपार (कोहळी), पो० सडक पिंपळगाव, ता० लाखनी, जि० भंडारा 441 804. स्थिरभाष: (07186)242 133, चलभाष: 094228 90937;
ई-पत्ता: borkarhp1944@gmail.com

■ **मोहनी,** अनुराधा - मराठी वाङ्मय, लोकप्रशासन व संस्कृत वाङ्मय ह्या तीन विषयांमध्ये एम्०ए०, याशिवाय कायदा व पत्रकारिता या विषयांतील पदवीधर. हिंदीची 'राष्ट्रभाषा पंडित' परीक्षा उत्तीर्ण. भाषा संचालनालयात मुख्यत: शब्दकोश व विधि अनुवाद ह्या शास्त्रांमध्ये २१ वर्षे काम. साहाय्यक भाषा संचालक ह्या पदावरून स्वेच्छानिवृत्त. 'भूमिसंपादन अधिनियम १८९४ - अर्थउकल' हा ग्रंथ प्रकाशित (मे २०१०); महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट वाङ्मयनिर्मिती पुरस्कार.
टपाल-पत्ता: 303 स्टाफ क्वार्टर्स, नरसी मोंजी इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट स्टडीज, स्कूल ऑफ फार्मसी अँड टेक्नॉलॉजी मॅनेजमेंट, बाबुळदे, ता० शिरपूर, जि० धुळे 425 405. चलभाष: 098814 42448, ई-पत्ता: amohoni@yahoo.co.in

■ **मोहिते** शरदिनी: एम०ए० (मराठी व संस्कृत), ६० नियतकालिकांत लेखन, समाज-शिक्षणमालेमध्ये साहित्य, इतिहास, भाषा, भूगोल, मानसशास्त्र इ० विषयांवरील पुस्तके प्रकाशित. बालांसाठी चार कादंबऱ्या. 'थर्ड वेव्ह' (ऑल्विन टॉफ्लर), 'देवदास' व 'परिणीता' (शरचंद्र चतर्जी) या पुस्तकांची भाषांतरे प्रकाशित.
टपाल-पत्ता: ए 1/4 शरयू, सरितानगरी, फेज-2, सिंहगड रस्ता, पुणे 411 030
स्थिरभाष : (020) 2425 1353, चलभाष : 099216 08242



अनुक्रमणिका

